


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

साहित्य
कला-संगम



महाराष्ट्र राज्य वर्धापन दिन • मे '६३

## श्रेयनामावलि—

- **पांच कथा :—शकुन**–रविंद्र पिंगे, **भजन**–पद्माकर गोवईकर, **पांचालीचे केस**–अ. अं. कुळकर्णी, **व्यथा**–श्रीपाद काळे, **फळभार**–दत्ता कदम.
- **चालू कादंबरी :—भीष्माचा डोंगर**–श्रीराम कामत यांच्या आगळ्या आणि नव्या धाटणीच्या चालू कादंबरीची पुढील दोन नवीन प्रकरणें—
- **ललित लेख :—**मंडला जिल्ह्यांतल्या रानावनाशीं एकरूप झालेल्या कजलीवनांतील **'बैगा'**–यशवंत शास्त्री, **'हा जय तुमचें कल्याण करो'**–आत्माराम नीलकंठ.
- **पांच कविता :—**ग्रेस, वि. म. कुळकर्णी, विजय सुराणा.
- एक **'न' काव्य :—**पंडित महाजन.
- **सदरें :—दीपमाला**–सारस्वत रसिक मनोहर, वारकरी व चित्रकार सातवळेकर. **ऐसीं अक्षरें रसिकें मेळविन**–केशव मेश्राम, प्र. श्री. नेरूरकर व सदानन्द रेन्दवणकर. याशिवाय हास्यचित्रें, व्यंगचित्रें, व्रिंगचित्रें, पानपुरके इत्यादि इत्यादि.

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


रे. न. ७७७६५

Gram : DALALART

# दीपावळी

**दलाल आर्ट स्टूडियो**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन: ७७७६५



तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २० त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६–००

● वर्गणी मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडियोच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● अंक न पोचल्याचें कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येतें. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


*सर्वेऽपि सुखिन: सन्तु । सर्वे सन्तु निरामय:*

# जय महाराष्ट्र !

**मुंबईसह** संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न साकार होऊन तीन वर्षें पुरी झाली व चौथें लागलें. गेल्या तीन वर्षांत आम्ही जी प्रगति केली त्याला जगाच्या इतिहासांत तोड नाहीं. हें राज्य निर्माण व्हायच्या पूर्वी या राज्यांतील थोर थोर विचारवंतांनीं जीं जीं सुखस्वप्नें रंगवलेलीं होतीं तीं सर्व खरीं होऊन त्या सर्वांची 'लिहिला प्रत्ययो आला। मोठा आनंद जाहाला' अशी स्थिति झालेली आहे; भगीरथाच्या मागें जशी गंगा चालली, तसाच सर्व सुखांचा प्रवाह आज आपल्या या आदर्श महाराष्ट्राच्या मागून चाललेला आहे. 'उदंड जाहलें पाणी। स्नान संध्या करावया' जिकडे तिकडे सुबत्ता आहे. गरिबांना पोटभर अन्न आणि अंग झाकण्यापुरता कपडा मिळतो. मध्यमवर्ग 'संतुष्ट सर्वदा सर्वें' आहे. आणि श्रीमंतांनीं अफाट दानधर्म आणि यज्ञकर्में आरंभून परमेश्वरालाहि संतुष्ट केलेलें आहे. खेड्याखेड्यांत नित्य दिवाळी चालू आहे. शेतकरी हर्षातिशयानें वेडा झालेला आहे. कसलेंहि न्यून नाहीं.

नाहीं म्हणायला उत्तर सीमेवर रणकुंड पेटलें तेव्हां थोडीशी चलबिचल झाली तेवंढीच; पण आपल्या या महाराष्ट्रांतील व्यापारीवर्ग किती शहाणपणानें वागला. त्या शहाणपणाबद्दल सरकार इतकें खुष झालें कीं त्यांनीं भित्तिपत्रकें लावून त्यांना जाहीर शाबासकी दिली. 'भाववाढ नाहीं ! साठेबाजी नाही ! नफेबाजी नाहीं ! हीच परिस्थिति कायम ठेवा ! धन्यवाद !' धन्य धन्य तो व्यापारीवर्ग कीं ज्यानें अशा रीतीनें आपल्या जिवाची कुरवंडी केली.

महाराष्ट्राची राजधानी मुंबई. तिथें तर काय जिकडें पहावें तिकडे सुखाचे नि शांतीचे पाट वाहाताहेत. आपल्या ह्या हिंदुस्थानांत खूप खूप वर्षांपूर्वी आदर्श असें रामराज्य होतें म्हणतात. पण त्या रामराज्याहूनहि अधिक वैभवसंपन्न आणि सुंदर असें राज्य कोणतें असेल तर तें आपलें हें मुंबई राज्य होय ! इथें मालक व मजूर एकमेकांच्या खांद्यावर हात घालून चालतात. मजुराला दु:ख झालें तर मालकाच्या डोळ्यांत अश्रु उभे रहातात आणि मालकांना नुकसान झालें तर मजुर उपास करतो. कांहीं दिवसांपूर्वी इथले खाणावळवाले म्हणाले, 'आम्हांला धंदा परवडत नाहीं हो !' लगेच लोकांनीं सांगितलें 'दर वाढवा !' आणि त्यांनीं आपले दर इतक्या हळुवारपणें वाढविले कीं लोकांना कळलें देखील नाहीं. खाणावळवाल्यांप्रमाणेंच मुंबईतील हॉटेलवाले, न्हावी, धोबी, वाहातुक करणाऱ्या मोटारी, विडीवाले, पानवाले, भाजीवाले, फळवाले, फूलवाले, किराणामालवाले, कोळसेवाले या सर्वांनीं जनतेला गाऱ्हाणें घातलें; आणि जनतेनें आनंदानें त्यांचा स्वीकार केला. आज परिस्थिति अशी आहे कीं 'आम्हीं दर वाढवितो आहोंत' असें त्यांना जनतेला सांगावें देखील लागत नाहीं. आपल्या मनाला येईल तसें त्यांनीं दर वाढवावेत–जनतेला सांगायचे आणखी कष्ट घेऊं नयेत–असा कायमचा परवाना जनतेनें त्यांना देऊन ठेवलेला आहे. जीवनोपयोगी सर्व वस्तूंच्या दरांनीं आज गौरीशंकराहूनहि जास्त उंची गांठलेली आहे. पण जनतेला त्याचें लवमात्र दु:ख नाहीं. आतां सहिष्णुवृत्तीचें हें उदाहरण पहा ना–उडपी हॉटेलवाल्यामुळें इराण्याचा धंदा बसूं लागला, तेव्हां मुंबईतील शीख लोक पुढें झाले. इराण्यांचें दु:ख त्यांना पाहावलें नाहीं. त्यांनीं दोन दोन लाख रुपये देऊन त्या इराण्यांची बोळवण केली. आणि त्या जागीं आपला धंदा उभारला. म्हणजे इराणीही सुखी आणि शीखहि सुखी झाले. असा हा मदतीचा सढळ हात पाहून इराण्यांचे डोळे कृतज्ञतेनें भरून आल्यास नवल नाहीं. एका दिशेला शीख, दुसऱ्या दिशेला मुसलमान भाई, तिसऱ्या दिशेला मद्रासी, चौथ्या सिंधी आणि मध्यें मराठी अशी मुंबईची सुंदर रचना आज झालेली

अनुक्रमणिका

कृ. सा. न. वि. वि.

आपला एप्रिलचा अंक वाचला. आपल्या उन्मेषशाली चतुर संपादनाचा प्रत्यय नेहमींच्या अंकाप्रमाणें याही अंकीं आला.

सौ. शिरीष पै यांच्या 'लडक चांफा' या कथेच्या, त्याचप्रमाणें 'जेव्हां विचार रणगाड्यावर आरूढ होऊन येतात' या लेखाच्या इलस्ट्रेशनचें सौंदर्य आणि अभिव्यक्तीच्या सामर्थ्याबद्दल धन्यवाद !

आपला कृपाभिलाषी
**रमाकांत ना. सावंत**
कळवा, ठाणा.

---

आहे. याशिवाय जगांतील सर्व तऱ्हेच्या जातीचे लोक इथें सुखासमाधानानें नांदताहेत. या सर्वांच्या उंचींत वास्तविक मराठी माणूस अंगुष्ठमात्र दिसतो; पण तसा तो दिसला म्हणून काय झालें ? त्याच्या हृदयाची श्रीमंति आभाळाएवढी आहे. आपल्या दुःखाची जाणीव दुसऱ्याला होऊं नये म्हणून तो सह-कुटुंब आत्महत्या करील; ( तसा तो करतोहि ) परंतु आपल्या कर्तव्यदक्ष शासनकर्त्यांना तो दोष देणार नाहीं.

मराठी साहित्याचें दालन तर आज अष्ट-दिशांनीं फुललेलें आहे; परंतु एक साहित्यिक दुसऱ्याचा हेवा करीत नाहीं. 'उंच नीच आम्हां नाहीं भेदभाव' अशी सर्वांची वृत्ति आहे. दुसऱ्याच्या दुःखानें दुखावे, दुसऱ्याच्या सुखानें सुखावे, असा समतोल स्वभाव. एकाचें नाटक चढलें तर दुसरा त्याच्यावर टीका करीत नाहीं. नाटककारामुळें नाटक कीं नटामुळें ? कीं नटीमुळें? असे फालतु प्रश्न इथें कुणाच्याहि मनांत निर्माण होत नाहींत. इथें संपादक आपापसांत भांडत नाहींत. एकमेकांचीं कुलंगडी उठवत नाहींत. वर्म काढून एकमेकांना शरमावीत नाहींत. आणि आपलीं खाजगी भांडणें जाहीररीत्या रंगवत नाहींत. सर्वांचा स्वभाव कसा निर्मळ दुधासारखा. आपल्या वर्तनानें सामान्य लोकांवर परिणाम होऊं नये अशी भीति सर्व साहित्यभक्तांच्या मनांत असते.

एवंच मुंबईसह महाराष्ट्र राज्याची आजची स्थिति ही अशी आहे. तिचे गुण गावे तेवढे थोडेच. आणखी कांहीं काळ ही अशीच परि-स्थिति राहिली तर अमरपुरीलाहि ती लाजवील यांत तिळमात्र संदेह नाहीं.

**जय महाराष्ट्र !**




कृ. सा. न. वि. वि.

आपल्या दीपावली मासिकाचे या पूर्वीचे कांहीं अंक मित्रांकडून वाचावयास मिळाले. त्यांत मौलिक अन् उच्च दर्जाचें साहित्य अस-ल्याचा अनुभव आला. त्यांतल्या त्यांत जाने-वारी, फेब्रुवारी अन् मार्चच्या अंकांतील साहित्य वाचून रसपान केल्याचा अननुभूत आनंद झाला.

मला कल्पना नव्हती ! दीपावलीचा काया-पालट इतक्या द्रुतगतीनें होईल व रसिकांची दर्जेदार साहित्याची भूक इतक्या लवकर भाग-विली जाईल. यापुढें रसिकांच्या अपेक्षा पूर्ण होतील अशी अपेक्षा करण्यास कांहींच हरकत नाहीं

दीपावलींतील श्री. जयवंतराव दळवी यांची लेखमाला हा उत्कृष्ट विनोदाचा उत्कृष्ट नमुना नाहीं असें कोण म्हणेल !

मार्च महिन्याच्या दीपावलींतील विनोद-मालेची शेवटची कथा 'एकाहून एक नग आहेत नग' ही विनोदी कथा म्हणजे जयवंत-रावांच्या विनोद साहित्य प्रतिभेचा एक अत्यु-त्कृष्ट नमुनाच होय. त्यांतील भावल्या किलिंडर, रमण्या आणि झिलू केदार या अपत्यांची आठ-वण रसिक वाचक कधींच विसरणार नाहींत.

पुन्हां अशीच एखादी विनोद कथामाला सुरु करुन रसिक वाचकांच्या उत्कृष्ट साहित्या-बद्दलच्या ज्या अपेक्षा आहेत त्या पुऱ्या होतीलच हीच आशा.

एकंदरींत दीपावलीचा प्रत्येक अंक त्यांतील उत्कृष्ट, दर्जेदार साहित्यामुळें संग्राह्य होईल यांत शंका नाहीं.

आपला,
**विठ्ठलराव तुकाराम वाविसकर**
प्राथमिक शिक्षक, ममदापूर

कृ. सा. न वि. वि.

आपला अंक आजच मिळाला. सौ. शिरीष पै यांची कथा वाचतांच अहाहा असे उद्गार निघाले. त्यांच्या कथेनें आपला अंक सुगंधी झाला आहे. साहित्य तर सारें सुंदर आहेच. पण अंकाची छपाई आणि उठाव याही बाबतींत आपणास अनभिकेवर मोजावयाचा प्रसंग आपल्या व्यावसायिक चढाओढकर्त्यांवरहि येईल यांत मुळींच शंका नाहीं.

**—आनंद साधले**

---

**शुभचिंतन !**










दाजी नाबर गांवांतील एक प्रतिष्ठित माणूस. तसा विक्षिप्त होता म्हातारा, जरा दुराग्रही, बराचसा अहंमन्य! पण मनाचा सरळ, अगदीं सज्जन. मग त्या व्यवहारांत निभाव कसा लागावा? गांवांत दाजी नाबर म्हणजे नेहमींच चर्चेचा एक विषय होता. त्याच्या गुणांचं चीज कधीं झालं नाहीं, होणार नव्हतं. होई फक्त हंसं! आणि दाजींची [illegible] आणि एकएक करणीसुद्धां अशी [illegible] असे कीं वाटावं हा वेडसर तर नाहीं? दाजी नाबराचं एक स्वप्न होतं कीं भीष्माच्या डोंगरपहाडावर गर्द हिरवी आंबराई [illegible] आणि उभ्या गांवाला थक्क करून सोडावं

(मागील कथानुसंधान)

६

—श्रीराम कामत

**भीष्माच्या** नांवानं जप करीत धर्मा रुद्रे वाटेला लागला. वेडा असा–दाजी नाबराला त्यांतच समाधान, मोठा अभिमान वाटला. जसा कांहीं तो स्वतः भीष्म होता! आणि–आणि दूर तिकडे, एकाद्या माजलेल्या हत्तीनं सोंडेनं आभाळ उचलून धरावं तसा दिमाखांत ताठ उभा असलेला तो डोंगर त्याची मिरास होती. दाजीचं हरपलेलं श्रेय जसं कांहीं या काळ्या पहाडाच्या लोहगर्भांत शिरून त्याला सादवत होतं.




होय.

आणखीं हें एक नवीनच खूळ त्यानं टाळक्यांत घेतलं होतं. वाचलं असंच कुठंतरी कीं सोव्हिएत रशियांत डोंगरपहाडावरसुद्धां फळ-बागा उठत आहेत. झालं, यानं तेंच लक्षांत ठेवलं. रशियांत जें घडतं तें आपल्या देशांत कां घडूं नये? प्रश्न त्याचाच. उत्तरही त्याचं त्याननं दिलं. प्रामाणिक प्रयत्न केला तर गोष्ट अशक्य नाहीं!–आणि दाजी प्रामाणिकपणं प्रयत्नाला लागला. कसोशीनं, जिद्दीनं, पडला त्यांत. या विषयावर मिळण्यासारखं होतं तें सर्व शास्त्रीय वाङ्मय त्यानं मिळवलं. बारीक अभ्यास केला. डोंगरावर तणदेखील धरणार नाहीं अशी साफ पडीत जमीन त्यानं निवडली. पांच दहा लोकं धावराला लावलीं. जमीन फातराची, दगड खोदणं म्हणजे अंगमेहनतीचं काम. फूटाला भाव आणि भाव ठरला. आखल्या प्लॅनाबरहुकूम माणसं खपूं लागलीं. ऊनी चष्मा, डोईला साहेबी टोपी, खालीं पंचा अशा पोशाखांत दाजी मुकादमी करी. खड्ड्यांत मुरूम, खत, मीठ असं बरचसं घालून ते तो भरून टाकी. आणि मग नित्यनेमानं वर पाणी घालीत राही. एकदां ही जमीन लागवडीला योग्य झाली कीं दाजी कलमं लावणार होता. आणि गांवाला दाखवून देणार होता–बघा लेको, दाजी नाबराची करामत! अशक्य तें शक्य करून दाखवलंन् त्यानं! आतां तुम्ही वाटेल ते बोंबला!............

धर्मा रुद्रे खालीं निवलकांड्याच्या गर्द पांदींत दिसेनासा झाला. दाजी आखाड्यांवर तसाच उभा होता. न जाणें कसला कर्माचा विचार करीत होता. आपल्याच तालांत, मनोराज्यांत हातवारे चालले होते. आणि तशा त्याच्या येरझारा सुरूं झाल्या.

आतेबाईनं हें पाहिलं आणि तिला हंसूं आलं. स्वारीची समाधि आज परस्पर अशीं बाहेर लागलेली बघून ती पुढं झाली. जवळ जाऊन नवऱ्याला म्हणाली, 'अहो ऐकलं का—'

पहिल्या खेपेला दाजीनें ऐकलं नाहीं. तो आपला आंतला आवाज ऐकत होता. तेव्हां दुसरा आवज ऐकूं जाणं शक्य नव्हतं!

'अहो ऐकलं का–' आतेबाईनं सूर चढवला. पंचमांत घेतला. तसं पांचव्या खेपेला दाजीचं लक्ष गेलं. त्यानं वळून मागं पाहिलं. म्हटलं, 'आतेबाई, कितीकदां सांगितलं तुम्हांला, आम्हाला सरळ नांवानं साद घाला. हें अहो–अहो काय? माझं नांव चांगलं दाजी आहे'

'मी सुद्धां हजारवेळ सांगितलं आहे कीं, बायका नवऱ्याचं नांव घेत नसतात.'

'घ्यावं. कांहीं होत नाहीं.'

'माझ्या कुंकवाचं बळ कमी होतं. मला तें वाढूं द्यायचं आहे.'

'खोटी समजूत, अंधश्रद्धा! देवळांत पुराणिकांनीं पसरलेली आणि तात्विक बैठक नसलेली.'

'असूं दे! माझी मला लखलाभ!' आतेबाईनं जाब दिला. आणि मग म्हटलं, 'अहो, बच्छी येणार आहे दुपारच्या एसटीनं.'

दाजीचं तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतं. त्यानं सहज विचारलं, बच्छी कोण?'

'बच्छी तुमची लेक दाजी नाबर' आतेबाई उसळून म्हणाली.

म्हणजे नवऱ्याचा छांदिष्टपणा तिला खपला नाहीं. संताप आला. वैताग आला. माणूस आहे कां कोण? मेलं डोचक्यांत काय शिजत असतं देव जाणें! प्रत्यक्ष स्वतःच्या लेकीचीसुद्धां आठवण रहात नाहीं तर आतां काय म्हणावं?

'हां हां! म्हणजे आपली वासंती–'दाजी भानावर आला.










‘मऽग वच्छी कोणऽ दुसरी ?’ त्याच्या बायकोनं तोंड वेंगाडलं.

‘नांव ठेवतील चांगलं वासंती. म्हणतील मात्र वच्छी–वच्छी. आपली लोकं ही अशीच.’ म्हातारा आपल्याशींच पुटपुटला आणि मग मोठ्यानं म्हणाला, ‘काय हो, वासंती येणार होती आज !’

‘सांगतेय काय मग ? दुपारच्या एसटीनं येणार ती.’

‘अहो, म्हणजे कोणालातरी पाठवायला हवं, शिरोड्याला, स्टॅन्डवर. श्रीकान्त कुठं ?’ दाजीनं विचारलं.

‘तो नाहीं जाणार. त्याला जमायचं नाहीं.’

‘म्हणजे मग मलाच गेलं पाहिजे.’

‘होय, तुम्हालाच !’ आतेबाईनं चिडून म्हटलं.

‘पण–पण तो धर्म्या येणार आहे कामाला.’ दाजीनं अडचण सांगितली. ‘डोंगरावर बसून राहील वाट बघत. फुकट त्याची खोटी-काय ?’

‘त्यालाच घेऊन जा बरोबर.’ ‘नाहींतरी ओझ्याला कुणीतरी हवंच.’ दाजीला बाहेर जळफळत टाकून आतेबाई घरांत निघून गेली.



साडेतिनची एस्.टी. आली चारला. अर्धातास खोटी आणि तरीही स्टॅन्डवरची ‘रोजची’ मंडळी म्हणत होती, ‘काय टायमावर आली हो गाडी !

हीं लोकं संवयीनं रस्त्याला दुतर्फा झालीं. कपाळावर हात घेऊन उगाच कौतुकानं बघत राहिलीं. एस्.टी. आली खडखडत, पोंगा वाजवीत, आजूबाजूला फसफस धुळीचे लोट उठवीत. स्टॅन्डवर एकदाची गाडी आणून आदळली आणि घाम पुशीत ड्रायव्हर बाहेर पडला. गळ्यांतील तिकिटांचं बिरुद मिरवीत कंडक्टर उतारूंना दमदाटी करीतच खालीं उतरला. निर्विकार चेहऱ्यानं बाजूला बांकड्यावर जाऊन बसला थंडपणं विडी ओढत. त्याची ड्युटी संपली होती. आतां पुढं कांहीं झालं तरी तो जबाबदार नव्हता. आंबलेल्या अंगानं आणि विस्कटलेल्या चेहऱ्यानं लोकं उतरत होतीं. मुक्कामाला पोंचल्यावर आतां त्यांना घाई झाली होती. घराची ओढ लागली होती. गाडीच्या चिंचोळ्या दारांत गर्दी उडाली. धक्के देत आणि खात लोकं विनाकारण हमरीतुमरीवर येत होतीं. स्टॅन्डच्या व्यवस्थापकाला तें रोजचं होतं. मुर्दाडपणं तो उभा होता.

अठरांवीस वर्षांची एक सुंदर तरुणी ‘एस.टीं.’तून खालीं उतरली. आणि तसे चालू आवाज एकदम बंद झाले. लोकांच्या नजरा चाळवल्या, तिरकस झाल्या, स्थिरावल्या आणि मग सगळ्यांचेच घसे एकाएकीं धरले असावेत ! म्हणून कीं काय खोकण्या–खाकरण्याचे एकएक विचित्र आवाज निघूं लागले, वाढत गेले.

वासंतीनं सहज आजूबाजूला पाहिलं. एकवार या लोकांना बघून घेतलं आणि तिचा हात नकळत पदरावर गेला. विस्कटलेले केस तिनं नीट केले. पदरानं तोंड पुसलं. इकडेतिकडे भिरभीर बघत ती तशीच उभी राहिली.

आणि मग बऱ्यांपैकीं एकाला राहवलं नाहीं. त्याच्या दृष्टीनं आजनं हें काम कांहीं और होतं. बघूनच खलास व्हावं असा हा मसाला

होता. तें रूप, तो रुवाब, तो नखरा—बस्स आणि त्या उल्लूला आवर राहिला नाहीं, विवेक उरला नाहीं. असक्तीनं धापा टाकीत तो म्हणाला, 'डोळे निवले रे ! आणि तशी झोप उडाली ! गड्यांनों, कोऽऽरे ती ?'

तो आणखीही बोलणार होता. पण एवढ्यांत एक जबरदस्त हात त्याच्या मानेवर पडला. मध्येंच हा व्यत्यय आलेला त्याला खपला नाहीं. डोळे वटारून त्यानं मागं पाहिलं.

उंच न् मजबूत बांध्याच्या एका तरुणानं सरळ त्याच्या मानेला हात घातला होता.

'तूं...तूं तुम्ही कोण ?' तो माणूस तत पप करूं लागला.

'सांगतों मागाहून. प्रथम यांची माफी माग.' तरुणानं बजावलं.

या हुकमी आवाजानं तो मवाली इसम गडबडला. चांगलाच हादरला. आणि तसा साफ शुद्धीवर आला. असं कांहीं होईल याची बेट्याला कल्पना नव्हती. म्हणजे बाजारांत इथं आचकट विचकट बोलणं चालतं, चालायचंच ! कोणी लक्ष देत नसतं. चांगल्या मोठमोठ्यांच्या बायकासुद्धां. पण–पण हा समंध तर अगदीं मानगुटीवरच बसला होता–नवखा दिसतो लेकाचा ! आणि विशेष म्हणजे भला ताकदीचा सुद्धां.

आतां काय करावं ? बापुड्याच्या चेहऱ्यानं तो आजूबाजूला बघूं लागला. आणि त्याची नजर रस्त्याच्या एका कोपऱ्यांत भांबावून उभ्या असलेल्या दाजी नाबराकडे गेली. तशी त्यानं बेधडक आरोळी ठोकली, 'दाजील.'

ती हांक ऐकली आणि दाजीचं लक्ष गेलं. तो ओरडतच धांवला, 'अरे, अरे सोड त्याला ! भर बाजारांत मारामारी करतोस ? काय मोंगलाई वाटली का काय रे ?'

'यांची माफी माग म्हणावं. सोडतोंच आहे.' त्या तरुणानं शांतपणं सांगितलं.

'माफी ? या पोरीची ? द्वारकानाथा काय भानगड रे ही ?' दाजी गोंधळांत पडला आणि त्यानं वळून त्या पोरीकडं पाहिलं. आं ! म्हाताऱ्याचं तोंड उघडं पडलं. काय बोलावं कळेना ! बोलणार तरी काय ? तोंड होतं कुठं ?–आणि दाजी नाबर मग एकदम ओरडला, 'धर्म्या, अरे आपली वासंती नाहीं ही ! हात् लेका ! उद्या गांवांत लोकं म्हणतील दाजीला स्वतःची पोर नाहीं ओळखतां आली.'

'बर–तर हो ! ताईबायना देखलं मी. काय ?' धर्म्या म्हणाला, 'पण अजिबाद ओळखलं नाहीं.'

वासंती मात्र तक्रारीच्या सुरांत म्हणाली, 'म्हणजे कमाल हो तुमची दाजी ! केव्हाधर उभी आहे मी. तुमचीच वाट बघत. या मवाल्यांचीं हलकट बोलणीं ऐकतें आहे.'

'द्वारकानाथा, बाबा यावर तुझं काय म्हणणं ?' दाजीनं विचारलं. त्याची बाजू ऐकून घेतल्याखेरीज एकतर्फी निर्णय देणं म्हाताऱ्याला बरोबर वाटेना.

पण द्वारकानाथ होता कुठं ? प्रत्यक्ष डोळ्यांनींच सगळं नाटकं पाहिलं आणि बेट्यानं ताडलं कीं प्रकरण जड जाणार, अंगावर शेकणार ! मधल्या या ओळख प्रात्यक्षिकांत नाहींतरी त्याच्या मानेवरचा तो दणकट हात थोडा सैल झाला होता. त्या तरुणाचं लक्ष दुसरीकडे गुंतलं होतं. त्याच्या हाताला एक जोरकस हिसडा देऊन द्वारकानाथ मोकळा झाला. आणि मग थांबतोच कशाला ? चट् पसार झाला.

त्या तरुणानंच हंसत दाजीच्या प्रश्नाला उत्तर दिलं, 'पळाला तो !'

'थॅन्क यू यंग मॅन !' दाजीनं म्हटलं आणि मग वासंतीला विचारलं, 'हे कोण ग पोरी ?'

तिला तरी कुठं माहित होतं ? हातांतील इवलासा रुमाल चुरगाळत तिनं त्या तरुणाकडे चोरटा दृष्टिक्षेप टाकला आणि हंसत सांगितलं, 'मिस्टर द्या करून आपली ओळख. सॉरी हं !'

'विजय शिर्के. रहाणार मुंबई. शिक्षण बी. ए. तूर्त नोकरीच्या शोधांत.' मोकळेपणानें त्यानं स्वतःची ओळख करून दिली. 'या बाजूला प्रथमच येतो आहे.'

धर्मा बाजूला उभा होता. त्यानं आपल्या मतें मुद्याचा प्रश्न काढला, 'अहो साहेब, या बाजूला म्हणजे नक्की कुठं तें जरा सांगा.'

'रेडी का कायसं नांव आहे गांवाचं. इथून तीनचार मैलांवर आहे म्हणतात.' विजयनं माहिती दिली.

'आतां हें तुम्हीच आम्हाला सांगा ! अहो, हा दाजी नाबर रेडीचाच कीं ! तुम्ही एक नवखे, म्हणून तुम्हाला माहीत नाहीं आणि मिस्टर शिर्के तुम्हाला म्हणून सांगतों, आमच्या गांवाचं खरं नांव रेवतीद्वीप. आठव्या शतकांत कदंबांची राजधानी होती ही. अहो, त्या ग्रॅन्सन साहेबानं आपल्या 'एन्शन्ट इंडियन हिस्ट्री' भाग पाहिला या बुकांत तसं चक्क म्हटलं आहे. आतां लोकं हें वाचीत नाहींत. उलट आम्हालाच म्हणतात, दाजी नाबर वाटेल तें भकतो.' ऐकणारं भेटलं तसं दाजीला अवसान चढलं. 'तर तात्पर्य, वासुदेव शास्त्र्यांची कविता आहे–हाय गे उज्जैनी ! दिट्टो तीच परिस्थिति झाली आहे बघा आमच्या या गांवाची ! काय ?'

एव्हाना धर्म्यानं माथ्यावर सामान घेतलं होतं आणि तसे ते रस्त्याला लागले.

मध्यंच कुणीसं हटकलं, 'दाजी पाहुणे दिसतात.'

दाजीनं त्याला होय म्हणून सांगून टाकलं आणि दोन पावलं चालून गेल्यावर खुलासा करण्यासाठीं पुन्हा तो मागं आला, 'ही आमची वासंती. शिक्षणाला आजोळी सोलापूरला होती. एस्. एस्. सी.ला बसली आहे यंदा. दुसरे हे मुंबइचे. ग्रॅज्युएट आहेत. आतांच मुलाखत झाली.'

'दाजी, पण परस्पर निघालांत. चहापाणी तरी...'

'नको–नकोच ! म्हणजे काय चहा मी पीत नाहीं आणि पाणीच प्यायचं तर तें तुझ्याकडे कशाला रे ?' दाजीनं उत्तर दिलं.

सारखं हें असंच चाललं होतं ! मुद्दामहून लोकं साद घालीत, आस्थेनं विचारपूस करीत, नसती चौकशी लावीत. दाजीला जाब द्यावा लागे. कधीं त्रोटक, कधीं सविस्तर विनाकरण कोणाला तोडतां तर येत नव्हतं ?—बाजारांतून हा असा गाजावाजा करीत दाजी जात होता. त्यालाही त्यांत मोठेपणा वाटत होता. धन्यता वाटता होती. एकप्रकारें त्याचा अहंकार सुखावला जाई. बरं वाटे त्याला. आतां पाठ फिरली कीं मागं हींच लोकं त्यांची थट्टा करीत, नाही तें बोलत.

या प्रकाराला अखेर वासंतीसुद्धां कंटाळली वैतागानं म्हणाली, 'दाजी तुमच्याबरोबर येणं अगदीं नकोसं वाटतं. इश्श ! मेलं उभं म्हणून किती रहायचं ? लोकांच्या फाजील नजरा–'

'पोरी तुझा बाप मोठा पब्लीक मॅन आहे. काय हो ?' दाजीनं विनोद केला. आणि आपला आपणच मोठ्यानं हंसत सुटला.

बाजार मागं पडला. रहदारी तुरळक झाली. घरं विरघळत चालली. पायाखालचा तांबडा रस्ता दाजीच्या बोलण्यासारखाच फाटे

अनुक्रमणिका






फोडत वळणं घेऊं लागला. बाजूच्या उजाड मोकळ्या शेतांत गुरं सैरा-वैरा धांवत होतीं. झिळमिळ झावळ्या हालवीत माड गुडघ्याला बाशिंग बांधून डुलत होते. खारा वारा जमिनीचा वास हुंगत होता.

आणि पुढं मिठागरं लागलीं. रस्त्याला उरावर नाचवीत दुतर्फा, दूरपर्यंत क्षितीजांत मिसळून गेलेलें ते मिठाचें आगर ! प्रचंड सोपान-पटच जसा तसे आंखलेले, उभे न् आडवे वाफ्ये. वाफ्यावाफ्यांत पाणी उन्हानं जड होऊन थरथरत होतं. पिकल्या मिठाचा दाट फेस वर तरंगत होता. कांहीं माणसं बांधावर मीठ गोळा करीत होतीं, बाजूला ढीग रचत होतीं.

विजय शिर्कें डोळे फाडून बघत होता. म्हणजे ऐकलं होतं त्यानं, वाचलं होतं. पण प्रत्यक्ष नजरेनं बघत होता आज.

आणि दाजी सांगत होता तीस का बत्तीस सालची गोष्ट... कायदेभंगाची चळवळ, मिठासाठीं इथं माऊलीच्या आगरावर, या उंडिणीच्या झाडाखालीं झालेला तो सत्याग्रह, कस्टमच्या लोकांनीं केलेले अत्याचार, टाळकीं फुटलीं, रक्ताचा सडा पडला...वगैरे वगैरे.

मध्येंच वासंती खोः खोः हंसत सुटली. हंसूं आवरेनाच पोरीला.

दाजी उसळला, ‘ हंसतेस काय ! घडलं तें सांगतोय्. पदरचा एक शब्द नाहीं घातला. अण्णागुरुजी आघाडीवर होता या सत्याग्रहांत. त्यानंच सांगितलं. अरे, ‘ टाइम्सां ’ त या एकदम बातम्या वाचल्या आणि वाचूनच आमचं मस्तक फिरलं. नोकरीचा चक्क राजिनामा खरडून कराचीहून इथं घरीं येऊन बसलों. ’

‘ दाजी, पण कोणाला सांगतांहात ? ’ वासंतीनं हंसत विचारलें.

‘ कोणाला म्हणजे ? यांना. तुला नाहीं. तुला काय कळतंय् यांत ? ’

‘ पण त्यांचं तर मुळीं लक्षच नाहीं ! ’ विजयकडे बघत तिनं मिस्कीलपणानं म्हटलं.

‘अहो–अहो लक्ष आहे माझं.’ विजय स्वतःला सावरीत म्हणाला, ‘ तुमचंसुद्धां कांहींतरीच बुवा ! खरं सांगूं, या असल्या गोष्टी आपल्या-सारख्यांकडून ऐकण्यांत खरी गम्मत. ’

‘ ऐकलंस ! पुढं बोल. ’ दाजीनं लेकीला डिंवचलं.

‘मी कशाला बोलेन. बोला तुम्हीच. ’ वासंती म्हणाली.

आणि दाजी बोलूं लागला.

पण आपण काय बोलत होतों हें एव्हांना तो विसरला होता. त्यानं वेगळाच विषय काढला. नाहींतरी कुठलाही विषय त्याला सारखाच महत्वाचा वाटे. दाजी नाबर सांगूं लागला, ‘ शिर्के. तुमच्यासारख्या सुशि-क्षित तरुणांनीं, खरं म्हणजे इथं खेड्यांत यायला हवं. तुमच्या शिक्षणाची किंमत आणि गरज खेड्यापाड्यांत. तें तुमचं कार्यक्षेत्र. महात्माजीसुद्धां हेंच म्हणत. काय ?’...दाजीचं नवं आख्यान सुरूं झालं. तें संपत नव्हतं. संपणारं नव्हतं.

सगळं लक्ष एकवटून विजय तें चऱ्हाट ऐकून घेत होता. कष्ट पडत. पण त्याचा नाइलाज होता.

वासंती मात्र तोंडाला मधूनमधून रुमाल लावीत होती. कशी जिरली या भावनेनं विजयकडे डोळे फाडून बघत होती.

मधली तर उतरून दाजी पैलथडीला आला. तिठ्यावर त्याला भेटला भाऊ कुळकर्णी. रोजच्यासारखा टक खात आणि बाता मारीत भाऊ पारावर बसला होता. दम्याचा विकार होता त्याला. या विकाराला खारी हवा बरी असं भाऊच्या मुंबईच्या मोठ्या डॉक्टरानं सांगितलं होतं. भाऊ कुळकर्णी एकटा नव्हता. दुसरी चार-पांच लोकं होतीं. त्यांच्या गप्पा मारे रंगांत आल्या होत्या. गांवकीच्या सल्लामसलती–म्हणजेच याच्यात्याच्यांबद्दल चहाड्या–कुचाळ्या ! दुसरं काय ?

मुद्दाम थांबून दाजीनं आज भाऊला हटकलं, म्हटलं, ‘ तुझ्या द्वारकानाथाला थोडा ताब्यांत ठेव भाऊ. पोर वहावत चालला आहे. हाताला लागता तर मीच सरळ केला असता. पण भडवा पळाला रे !!’

‘ नशीब समज ! म्हणून थोबाड शाबूत राहिलं तुझं दाजी.’ भाऊनं जोरांत सांगितलं. त्याचा आवाज पिचका होता आणि बदल्या कीं मध्येंच बसल्यासारखा होई. ‘ शहाणा असशील तर माझ्या द्वारक्याच्या वाटेला जाऊं नकोस. ’

‘ काय करशील ? ’

‘ मी नाहीं, काय करायचं तें तोच करील. अरे, मिलिटरी माणूस तो. आतां नसेल. पण एकवेळ होता. दाजी तूं माशा मारतोस, तशीं माणसं उडवलीं आहेत त्यानं. आघाडीवर–काय ?’

‘ होय–होय !’ बाजूला बसलेल्या मंडळींनं साथ दिली. म्हणजे द्वारकानाथाचा एकूणएक पराक्रम त्यांनासुद्धां तोंडपाठ होता.

तसं भाऊला आणखीन् जेल चढलं. तो खेकड्यासारखा कुरकुरत तो म्हणाला, ‘ दाजी तेव्हां या अशा माणसाबरोबर जरा बेतानं वागावं कीं नाहीं !’

‘ आमच्या पोरीबाळींना त्यानं काय वाटेल तें बोलावं–वर बेतानं वागावं आम्हीच काय ?’ दाजी संतापून म्हणाला.

‘ अरे तरूण तो ! अंगांत रग, सळसळतं रक्त. कसं सांगूं तुला ? थोडा काणाडोळा करायला हवा. ’

‘ मला कांहीं सांगूं नकोस. तुझ्या पोरांचा बंदोबस्त कर.

यावर भाऊ खवट हंसला. सोनेरी फ्रेमच्या चष्म्यातून किल्या डोळ्यानं त्यानं पाहिलं. तसाच बघत राहिला दाजीकडे. खुळा का काय या भावनेनं. आणि मग म्हणाला, ‘ तर रे काय ? तुला नाहींच ते समजायचं. कारण सोवळा काँग्रेसवाला पडलास तूं. दाजी नाबरा, चोरून तरी कधीं दारू प्याला आहेस तूं ? का जुगार खेळला आहेस ? का माझ्यासारख्या रांडा ठेवल्या आहेस ? हः हः ! दचकूं नकोस. आपलं विचारतो. फुकट बाबा–अगदीं व्यर्थ बघ तुझं जिणं ! अरे, माणसानं प्रत्येक गोष्टीचा अनुभव घेतला पाहिजे. आणि तसा जो घेतो तो मर्द ! काय माझा द्वारक्या मर्द आहे, मर्दांचा मर्द...हीःही...’

तरीसुद्धां दाजी उभाच होता. भाऊ कुळकर्ण्यांचा शहाणपणा ऐकत होता. वासंतीला तें सहन झालं नाहीं. हाताला धरून बापाला तिनं ओढलं. फणकाऱ्यानं म्हटलं, ‘ चला बघूं दाजी ! या माणसांची लायकी काय ? कसली हुज्जत घालतां ? ’

‘ आं ! कोण रे ही मुडदुशी ? ’ भाऊ मान उंचावून पुटपुटला आणि डोळे मिटून गुळगुळीत टक्कलावरून हात फिरवीत राहिला.

‘ वासंती. दाजीची मुलगी मी भाऊ ! कळलं ? ’ वासंतीनं खचखट-पणं जाब दिला.

‘ हां ! ’ भाऊनं दीर्घ हुंकार दिला. पण त्याला कळलं मात्र नव्हतं. उगाच नाहीं ! आंबट चेहऱ्यानं तो पुटपुटला, ‘ अरे या अशा चटक चांदण्या रस्त्यांत नाचवा ! आणि वर भाऊकडे तक्रारी करा–द्वारकानाथ बिघडला.’

‘ भावड्या–’ आतां मात्र दाजी नाबर खवळला.

...पान ४४ वर







# पांचाळीचे केस

--अ. अं. कुळकर्णी

*यापूर्वींचीं लग्नें करतांना मला प्रत्येक वेळीं कसली तरी धुंदी होती. पहिल्या वेळीं तारुण्याची, दुसऱ्या वेळीं कृतज्ञतेची तर तिसऱ्या वेळीं कीर्तीची. पण या वेळीं मी माझ्यासाठीं लग्न केलं नाहीं, लाज वाटते उच्चारायला; पण सांगतें......*



होऊं नये तें--पण मला हवं होतं तेंच--झालं होतं.

बाई माझ्याजवळ येऊन बसली होती. बसतां बसतां स्वतःच्या मुलाला म्हणाली होती, " असूं दे, असूं दे गर्दी. हे आपल्या ओळखीचेच आहेत. मी इथंच बसते. तूं बस तिथं पुढं. "

तीन नंबरची बस टिळक रोडवरून स्टेशनकडे जात होती. स. प. कॉलेजच्या स्टँडवर मी बसमध्यें बसलों होतों. मी बसलों होतों तो बाक तीन सीटसचा, बसमध्यें चढतां चढतां समोरच असणारा होता. मी बसून त्यावर आणिक एक जागा उरली होती. माझ्या मागून दोन उतारू बसमध्यें चढले होते, पण माझ्या बाकावरची जागा त्यांच्या लक्षांत आली नसावी. ते आपले उभेच होते. जागा लक्षांत न येण्याचं श्रेय त्या बाकावर माझ्याअगोदर असलेल्या असामीलाहि अर्थातच होतं, बाकीची बस जवळजवळ फुल्ल झालेली होती. नाहीं म्हणायला ड्रायव्हर जवळच्या बाकावरचा एक सीट अजून खालीं होती.

महाराष्ट्र मंडळाच्या स्टँडवर तीं दोघे बाईबाईनं बसमध्यें चढलीं. पुढें हातांत सूटकेस असलेला तिचा मुलगा आणि मागं खांद्यावर पिशवी लटकावलेली व दुसऱ्या हातांतील पर्स सावरीत असलेली ती.

इतका वेळ ऐसपैस आणि शक्यतों आपल्या बाकावर आणखी तिसरं कोणीं बसूं नये अशा थाटांत बसलेला मी त्या दोघांना विशेषतः तिला पाहून जरा सावरून बसता झालों.

माझी हालचाल मी अशा बेतानें केली कीं तिथं जागा आहे हें तिच्या लक्षांत यावं.

—आणि झालेंहि तसंच. मुलाला पुढं जायला सांगून ती माझ्याजवळ—मला जरा खेटूनच बसली. खेटून बसण्याशिवाय तिला गत्यंतरच नव्हतं. किरकोळ मापाच्या तीन सिटांना जेमतेम पुरणाऱ्या त्या बाकावर आतां चांगला चार–साडेचार सिटांचा ऐवज जमला होता.

पण ही दाटी मला आवडली.

ती बसमध्यें शिरली त्या वेळेपासून बहुतेक सर्व उतारूंच्या नजरा तिच्या भोंवतीं वावरूं लागल्या होत्या. या गोष्टीला अर्थातच कुणाचाच इलाज नव्हता. जसा तिचा नव्हता तसा बसमधील लोकांचाहि नव्हता. एकतर ती अतिशय सुंदर होती. अंगापिंडानें सुडौल होती. दुसरं असं कीं ती पेशानं नटी होती. चांगली नाणावललेली नटी होती. तिच्याबद्दल बरंच कांहीं बोललं जाऊनहि लोकांच्या मनांत तिच्याबद्दल अजूनहि खूपसं कुतूहल कायम होतं. नाटक-सिनेमांत—दोन्ही क्षेत्रांत ती खूप गाजलेली होती. 'पांचाली' या लोकप्रिय नाटकांत तिचं काम तर इतकं छान होत असे कीं, तिचें खरं नांव लोक विसरले होते. अनेक लोक तिला आतां 'पांचाली' या नांवानंच संबोधित होते.

बाई असणं, नटी असणं, किंवा सुंदर असणं यापैकां जेंथ कुठलेंहि एक कारण पुरण्यासारखें होतें तिथं सर्वच कारणं एकवटलेली होतीं आणि वर या सर्वांच्या भोंवतीं कुतूहलाची प्रभावळहि होती, इतकें असल्यावर मग आणखी काय पाहिजे होतं ! बहुतेक सारेजण तिच्याकडे पहात होते.

मला कसं तरी होऊं लागलं.

" काय घरीं निघालांत वाटतं ? रोज इतका उशीर होतो ? तिनें विचारलें.

तिच्या प्रश्नांत मला आज सलगी जाणवली. खरं म्हणजे ती आपण होऊन कधीं कोणाशीं बोलतच नाहीं. बोलली तरी इतकी लाघवट कधींच बोलत नाहीं. तिच्या शब्दांत माधुर्य आहे. वाटणींत सौजन्य आहे. परंतु कमालीचा अलिप्तपणा आहे; म्हणून एरव्हीं कधीं न आढळणारी जवळीक तिच्या या प्रश्नांत मला वाटली.

'रोज नाहीं इतका होत पण आज मात्र उशीर झाल.य्. जरा. इन्कम् टॅक्स ऑफिसमध्यें गेलों होतों; अजून जेवण व्हायचंय्. घरीं वाट पाहत असतील." घड्याळाकडे पहात मी म्हणालों.

मी वाजवीपेक्षां जरा अधिकच खुलासा करुन गेलों होतों.

बस वाहत्या रस्त्यावरुन चालली होती. कमीजास्त वेगानें चालणाऱ्या वाहनाचे सहज प्राप्त हिंदळके उतारूंना बसत होते. वळणावळणावर अंगांवर अंगें कलंडत होतीं. माझ्या शरीराची डावी बाजू रोमांचली होतीं. माझ्या दंडांतून आणि मांडींतून गोड झिणझिण्या उमटत होत्या. अपराधित मनानं मी तें स्पर्श-सुख अनुभवीत होतों. मनाच्या बांधाला न जुमानतां शरीरांतील रक्त सळसळत होतें.

मी कसंबसं विचारलं, " कुठं, रेडिओ स्टेशनवर निघालात वाटतं ? "

माझ्या आवाजांतील घोगरेपणा तिच्या लक्षांत येऊन चुकला; तिनें माझ्याकडे खोल खोल पाहिलं.

मी कांहीं तिच्या दृष्टीस दृष्टी देऊं शकलों नाहीं.

काय समजायचं तें ती समजली.

आमच्या समोरच्या बाकावरचा एक इसम डेक्कनच्या स्टॉपवर खालीं उतरण्यासाठीं उठला. तशी ती समोर जाऊन बसली आणि म्हणाली, 'आतां बसा आरामशीर !'

माझ्याबद्दल वाटणारी कींव मला तिच्या डोळ्यांत दिसली.

तिनें विचारलें, " काय म्हणालात ? "

मी खजील होऊन म्हटलें, " रेकॉर्डिंग आहे वाटतं ? "

" तसं मला रेडिओ-स्टेशनवर जायचंय म्हणा, पण तिथं माझं काम फार वेळ नाहीं. फार तर दहा–पंधरा मिनिटं लागतील. मी खरी निघालेय मुंबईस. सव्वातीनच्या गाडीनं. जातां जातां रेडिओवरचं काम उरकावं म्हणून अम्मळ-अम्मळ कशानं बरींच आधीं निघालेंय. दीड तर वाजतोय अजून–"

" अरे वा ! मग बरंच झालं कीं ! " मी बोलून गेलों.

माझ्या आवाजांतील स्वर कमी झाली होती, पण वृत्तींत उत्पन्न झालेला गोंधळ अजून पूर्णपणें संपला नव्हता.

" कां ? बरंच झालं म्हणालांत तें कां ? "

" मलाहि मुंबईलाच जायचंय. मी आत्तांच दुपारच्या गाडीनं निघणार आहे. घरीं जाणार, जेवणार, आणि स्टेशनवर जाणार, मी सांगितलें.

यावर ती कांहीं बोलली नाहीं.

बसच्या वेगामुळें वाऱ्याचा झोत अधिक वाढत होता. कपाळावर येणारे केस ती पुनः पुन्हा मागे सारत–सरशीत होती.

तिच्या अंगापिंडाकडे विशेषतः सुंदर केशसंभाराकडे माझी दृष्टि वारंवार वळत होती. माझं बघणं तिच्या लक्षांत येत असावं असं वाटल्यावरून मी उन्हाचं निमित्त केलें आणि गॉगल घालून बाहेर पाहूं लागलों.

मनांत आलं बाई सुंदर तर खरीच, पण हिचे केस किती छान आहेत !...या केसांमुळंच ही आहे त्यापेक्षां कमी वयाची दिसत असावी. 'पांचाली' नाटकांत हिच्याबरोबर



'प्रिये ! आज तूं फारच सुंदर दिसतेस—'

काम करायला मिळालं आणि दुःशासनाच्या रक्तानें माखलेल्या हातानें जर हिच्या केसांची वेणी घालायला मिळाली तर किती छान होईल! काय केस आहेत? हिचं सारं सौंदर्य केसांत साठवलंय... केस भलतेच मऊसूत असतील......

कांहीं तरी बोलायचे म्हणून मी विचारलं, 'दाते मुंबईला आहेत वाटतं सध्यां?'

प्रश्न विचारून झाला मात्र आणि क्षणांत त्या सुंदर मुखावरचे भावरंग बदलले. बाईचा चेहरा व्यथेनं कालवंडला. ती एकदम दहा वर्षांची वृद्ध दिसूं लागली.

हें काय झालं? मी स्तंभित झालों. माझा स्टॉप आतां येणार होता आणि मला उतरावं लागणार होतं. मी उठून उभा राहिलों.

'काय झालं?' मी विचारलें.

'कुठं काय?' तिनें श्वास निरोधून म्हटलें.

'माफ करा. मी सहज विचारलं. चुकलं असेल तर...'

'छे, तसं कांहीं नाहीं. येतायना तुम्ही मुंबईला?'

'बघतों.'

मॉडर्नच्या स्टॉपवर मी खालीं उतरलों आणि चालूं लागलों. माझी अस्वस्थता वाढली होती. मी आज चळल्यासारखा वागलों होतों. स्थळ-काळाचा मला विसर पडला.

गेलीं चार-पांच वर्षें मला धंद्यांत बऱ्यापैकी पैसा मिळत होता. त्या जोरावर मी नाट्यकलेचा अभ्युदय करायला निघालों होतों. भोंवती नवनवे स्नेही जमले होते. हौशी कलावन्तांच्या नादीं मी लागलों होतों. चुकलं तर नाहीं ना? म्हणत म्हणत मी चुकत होतों. चार-दोन नाटकें मी 'फायनान्स' करून बसलों होतों. या कलावन्तांच्या दृष्टीनें मला भरत नाट्यापासून नवनाट्यापर्यंत बरेंच कांहीं ज्ञात होतें. दिग्दर्शनाबाबत माझा कांहीं स्वतंत्र आग्रह होता. 'तुम्ही मनांत आणलेंत तर एक चांगले नट व्हाल. आणि जरा बैठक मारलीत तर एखादं नाटक सुद्धां लिहूं शकाल,' या त्यांच्या अंदाजावर माझा विश्वास बसूं लागला होता.

'थोडक्यांत मला ते बनवीत होते. पण त्यांचं बनविणं मला वेळींच उमगलं नव्हतं. मी पैसा घातलेलीं सर्व नाटकें जेव्हां चक्क पडली तेव्हां कुठं माझ्या डोक्यांत तसा थोडा प्रकाश पडूं लागला होता.

या नाटक-व्यवसायामुळेंच या बाईबद्दल मला कर्णोपकर्णी बऱ्याच गोष्टी समजल्या होत्या. तिच्याबद्दल मला कमालीचें कुतुहल वाटूं लागलें होतें. तिच्यासंबंधीं आणखी कांहीं कळावें म्हणून मी चौकशी करीत होतो.

या बाईच्या आयुष्यांत चार-पांच पुरुष आले होते. पण साऱ्यांशीं तिनें लग्नें केलीं होतीं. तिचं वागणं सत्वशील गृहिणीसारखें आहे असं बोललं जात होतं. व्यवसाय नटीचा असला तरी तिला पांचटपणा, छचोरपणा मुळींच शिवला नव्हता. तिच्याबद्दल तसं कांहीं बोलण्याची कोणाचीच टाप नव्हती. परवा परवापर्यंत ती वटपौर्णिमेला वडावर पूजेला आलेली सुद्धां लोकांनीं पाहिली होती. नाटक-सिनेमांत तिनें कधीं थिल्लर कामें केलेलीं नव्हतीं. नेहमीं भारदस्त गंभीर भूमिकाच पत्करलेल्या होत्या. वत्सल, माता, बापामागें कुटुंबाचा भार वाहणारी थोरली बहीण, प्रेमळ सिस्टर, करारी आनंदीबाई, जिजाऊ, सिंधू आणि अशाच इतर. स्त्री हा समाजाला आशिर्वाद आहे हें सिद्ध करणाऱ्या साऱ्या भूमिका ती इतक्या तन्मयतेनें करी कीं, वाटे ही स्त्री असेंच एखादं आयुष्य जगायला परमेश्वरानें जन्माला घातली असावी!

आणि मग प्रश्न पडे कीं, हिचं जीवन असं का?

तिनं चार-पांच लग्नं केलीं होतीं. होय, केलीं होतीं. अगदीं उजळ माथ्यानं ती चार वेळा विधीपूर्वक विवाहित झाली होती. दात्याशीं केलेलं लग्न तर तिनें अगदीं परवा-परवाच्या चाळिसाव्या वर्षी केलं होतं. तिचा थोरला मुलगा चांगला बावीस वर्षांचा झालाय्, अशा वेळीं; जगांत दोन पति हयात असतांना!

तिचं सौंदर्य, स्वभाव, चारित्र्य, खाजगी आणि व्यावसायिक जीवन सारं काहीं गूढ होतं. कोणाला कुतूहल वाटावं असंच होतं. एरव्हीं शिवाजीनगरला गाडींत बसणारा मी पुणें स्टेशनवरच गेलों. तीहि नुकतीच स्टेशनवर आली होती. मुलगा परत जाणार असावा. मुलाला काय सांगायचें तें सांगून ती माझ्याकडे वळून म्हणाली, 'कांहीं हरकत नसली तर मीच तिकिटें काढतें.'

माझ्या पुरुषी मनाला तें पटेना. पण मी हो-ना करण्याच्या आंत ती खिडकीकडे गेली आणि तिनें तिकिटें काढलीं.

तिचा मुलगा परत गेला.

प्लॅटफॉर्मवर जातां जातां मला ती म्हणाली, 'जरा निवान्तपणें बोलतां येईल म्हणून मी फर्स्ट क्लासचीं तिकिटं काढलीं आहेत.'

'मला सिगारेटचं पाकीट घ्यायचंय्— आलोंच मी—' म्हणत मी स्टॉलकडे गेलों. ती डब्यांत शिरली.

गाडी सुटायला दोन मिनिटें उरली आहेत असें पाहून मी डब्याशीं आलों. डब्यांत तिच्याशिवाय दुसरं कोणीच नव्हतं. मी डब्यांत चढलों. बाई डोळे पुशीत होती.

विचारावं तरी कसं?

माझी चाहूल तिनें ऐकली आणि म्हणाली, 'बसा!'

मी बसलों. गाडी सुरूं झाली.

या बाईला इतकी दुःखी कष्टी झालेली मी कधींच ऐकलं नव्हतं. जें कधीं ऐकलं नव्हतं; तें अनपेक्षित प्रत्यक्ष पहात होतों.

शून्य नजरेनें ती खिडकीबाहेर पहात होती.

मी सिगारेट शिलगावली आणि मुकाट बसलों.

मी कांहीं विचारावयाच्या आंत ती बोलूं लागली—

'हे गेले तेव्हां मी बावीस–तेवीस वर्षांची होतें. आमचा सहा-सात वर्षे संसार झाला. मला दोन मुलं झालीं. दोन्ही मुलगेच. ह्यांच्या आजारीपणांत गोखल्यांनीं अपार कष्ट केले. रात्र पाहिली नाहीं, दिवस पाहिला नाहीं. पाठचा भाऊ काय करील? इतकं केलं. खर्चाला सुमार नव्हता. औषधपाण्यापायीं हजारों रुपये खर्च झाले असतील. आम्ही कुठून आणणार होतों? सारं गोखल्यांनीच केलं. शेवटीं रक्त द्यावं लागलं तेंहि गोखल्यांचंच जमलं; त्यांनींच दिलं. असा स्नेही साताजन्मीं लाभावयाचा नाहीं.'

'...हिला सांभाळ...यापुढें मुलांचा बाप तूंच...गेलं वर्षभर तूंच सारं करतोयस, पहातोय् मी...पुढल्या जन्मीं तुझ्या पोटीं जन्म घेऊन तुझे उपकार फेडीन...' असं म्हणत ह्यानीं प्राण सोडला. पुढं महिन्या–दोन महिन्यांत मी साऱ्यांची गोखले झाले.'

आलेला उमाळा प्रयासानें दडपून टाकीत बाईनं पुन्हां खिडकीकडे तोंड फिरवलें आणि जराबेळ ती अबाक् झाली.

'आज खपली निघाली. वाहील तशी जखम वाहूं देणार आहे मी. तुम्हांला कंटाळा येईल कदाचित्...'

अनुक्रमणिका

मी कांहीं बोलण्यापूर्वीच ती पुढें म्हणाली, 'काय योगायोग आहे पहा. नाहीं नातं, नाहीं गोतं. तुमची माझी ओळखहि अलीकडची. पण मी तुमच्यापुढं माझं हृदय मोकळं करतेंय. मुंबईहून सकाळीं पत्र आलं आणि बेचैन झालें मी. कसाबसा इतका वेळ धीर धरला मी. आतां मला पोटभर रडायचंय. सगळं चरित्र कुणाला तरी सांगायचंय. त्याशिवाय मला मोकळं मोकळं वाटायचं नाहीं. आंतल्याआंत गुदमरणं सोसवत नाहीं.'

'मला ठाऊक आहे, माझ्या आयुष्याबद्दल सर्वांनाच कुतूहल आहे. असणारच ! लोक माझ्याविषयीं कुजबूज करतात, पण सरळ येऊन मला कोणीच कांहीं विचारीत नाहींत. तसं धाडस अजून कोणी केलं नाहीं. माझ्या वैवाहिक जीवनाबद्दल सगळ्यांना कमालीचं आश्चर्य वाटतंय. खरं ना ? तुम्हांला सुद्धां ही बाब समजून घेण्याची उत्कंठा आहे. तुम्ही चौकशी करता; कुठं कुठं माझ्या कानांवर आलंय.'

तिचं म्हणणं खरं होतं. पण असा अचानक हल्ला होऊन तोंडावर रोखठोक प्रश्न विचारला जाईल आणि रुजुवातीची पाळी येईल असें मला कधीं वाटलं नव्हतं. मी वरमलो आणि खुलासा करीत म्हणालों,

'हो. तसं थोडं वाटतं खरं. पुष्कळांना खरं कांहीं माहीत असत नाहीं. वाटेल तें भलतं सलतं बोलतात. तसं कांहीं कोणी बोललं कीं वाईट वाटतं आणि मग साहजिकच वाटतं कीं, खरं काय असेल तें एकदां समजलेलं बरं. म्हणून चौकशी करतो मी. पण–पण जें कांहीं सांगाल ते इथंच राहील. इकडचं तिकडं होणार नाहीं. खात्री असूं द्या.'

'मला त्याची आतां पर्वा नाहीं. मनाला पटलं तें करायला मी कधींच भ्यालें नाहीं. एकामागून एक इतकीं लग्नं केलीं मी; लोकांचा कुत्सितपणा मनाला लावून घेतला असता तर मी जीवनांतून कधींच उठून गेलें असतें. मी आज सगळं संगळं बोलणार आहे. बसमध्यें मघा तुम्ही 'मुंबईला येतों' म्हणालात आणि ठरवलं कीं, तुमच्याशीं मनमोकळं करायचं......

'गोखल्यांबरोबर मी सात वर्षे संसार केला. साठे कुटुंबावर गोखल्यांचे अगणित उपकार आहेत. माझीं मुलं मोठीं झालीं, शिकूं लागलीं ती गोखल्यांमुळेंच. मी पायावर उभी राहिले, या धंद्यांत स्थिर झाले तीहि गोखल्यांमुळेंच. म्हणून त्या गृहस्थाबद्दल मी फारसं कांहीं बोलूं शकत नाहीं. मी तीन चित्रपटांचं माझं उत्पन्न त्यांच्या स्वाधीन केलं आणि वेगळी राहूं लागलें. साठे कुटुंबाला गोखल्यांच्या आर्थिक ऋणांतून अंशतः मुक्त करण्याचा माझा तो यत्न होता...

'गोखल्यांना मी सोडलं त्यांत त्यांचा नेमका कोणता दोष होता हें मला नीट सांगतां येणार नाहीं. दैवानंहि खैर केली. सात वर्षांच्या दीर्घ कालांत मी पुन्हा आई झालें नाहीं. गोखले जरा निराळे पुरुष असते तर मी तिसऱ्यांदा लग्नाच्या फंदांत पडलें नसतें असं कधीं कधीं वाटतं, पण पुन्हां वाटतं तें कदाचित् खरंहि नसावं. सात वर्षांच्या गोखल्यांच्या कारकिर्दीचा जमाखर्च कसाहि मांडला तरी त्या माणसाकडे भलेपणाच जाईल. तो अतिभलेपणाच मला सोसला नसावा. ज्या वेळीं मी वेगळं राहण्याचा माझा निश्चय त्यांना सांगितला त्यावेळीं त्यानीं तो इतक्या निर्विकार मनानं आणि मख्खपणानं ऐकला कीं, मी केलेला निर्णय बरोबरच होता असं मला वाटलं... पैसेहि थोडा आग्रह केल्यावर स्वीकारले.'

'साठ्यांनीं आपल्यावर सोपविलेला एक संसार साभाळावयाचा, त्या संसारातील व्यक्तींना हवं–नको बघायचं, मित्राची मरणकाळची इच्छा पुरी करायची या परीस दुसरं गोखल्यानीं कांहींच केलं नाहीं...विश्वस्त असतो ना तसं!...'

'पण जाऊं देत. गोखल्यांनीं मला सर्व प्रकारचं स्वातंत्र्य दिलं; म्हणूनच मी पुन्हा सव्विसाव्या वर्षी तोंडाला रंग लावूं शकलें. नंतरच्या पाच वर्षांत माझं आयुष्य पार बदललं. मला कीर्ति आणि संपत्ति मिळली. गोखल्यांनीं वाव दिला नसता तर हें झालं नसतं.'

'या काळांत नटीच्या पेशामुळं मला वेळीअवेळीं कसंहि वागावं लागलं. रात्र रात्र मी घरां नसे. आठवडे अन् आठवडे मी शूटिंगसाठीं बाहेरगांवीं जात असे. पण त्या शुंभानं मला कधींच कुठं हटकलं नाहीं, अडवलं नाहीं. मला वाटे माझ्या या जीवनाला नवरा कसा हिरवट, माझ्यावर सत्ता गाजविणारा हवा, पण त्याला कधीं कसला राग आला नाहीं. कधीं कसला लोभ वाटला नाहीं. मला त्या व्यवसायांत आणि त्या वयांत स्वतःला सांभाळणं किती जड गेलं असेल याची कल्पना करा. पतीच्या ढालीशिवाय मी स्वतःचा षड्रिपूपासून बचाव करीत असे. मला कधीं कधीं हा ताण असह्य होई. गांभीर्याचा–करारीपणाचा बुरखा मी वळेच घेई आणि माझ्या स्वयंभू अवखळ, आनंदी वृत्तीचा कोंडमारा करून टाकी. लोक मला दबकून असत. असें ढोंगी जीवन इतरां पचत असेल, पण आपल्या व्यवसायाला तें पोषक नाहीं, उलट मारक आहे असें मला नित्य वाटे. मी केलेल्या साऱ्या भूमिका बऱ्या झाल्या असतील, प्रसंगीं चांगल्या वठल्या असतील; पण त्या करतांना मी कधीं रंगून झिंगून गेल्याचं मला आठवत नाहीं. हा उणेपणा त्यांत रहायला नको होता. गंभीर भूमिकांचा शिक्का माझ्या कपाळीं कायमचा बसला. आणि माझा अवखळ अल्लडपणा आणि आनंदी उत्साही वृत्ती इतिहासजमा झाली.'

'मला खरं ओळखणारा पुरुष तसंच मला खरं समजणारा दिग्दर्शक भेटावा आणि माझ्या जीवनाचं सार्थक व्हावं असं मला फार फार वाटे. निदान ती लालसा कांहीं दिवस होती. अशा मानसिक अवस्थेंत मी हृषिकेशांशीं लग्न केलं. त्या कैफी जनावराबरोबर मी कांहीं वर्षे काढलीं; कशीं तीं माझीं मलाच माहीत ! अर्थात् त्यांच्यामुळेंच माझी व्यावसाईक प्रगति झाली. माझ्यांतील नटी खुलून पुढं आली. कीर्ति कळसाला पोंचली. जें झालं तें हृषिकेशांमुळेंच हें मला कबूल केलं पाहिजे.'

'हृषिकेशांचं दिग्दर्शन लाभणं हें त्यावेळीं महान् भाग्य समजलं जाई. मला तें भरपूर मिळालं. त्याच्या बदल्यांत मला बरेंच कांहीं सोसावं लागलं आणि तें मी सोसलं; वेड लागल्यागत. पण माझी कांहीं तक्रार नव्हती; नाहींहि.

'दिग्दर्शक हृषिकेश आणि गृहस्थ हृषिकेश हीं दोन व्यक्तिमत्वं इतकीं भिन्न आणि परस्पर विरोधी आहेत कीं, माझ्या वांट्याला आलेली त्यांतील विसंगति जर मी कुणाला सांगितली तर लोक माझ्यावर मुळींसुद्धां विश्वास ठेवणार नाहींत.'

'हृषिकेश बहुधा नशेंतच असत. सेट, बाई वा बाटली कसला तरी अम्मल त्याच्यावर चढलेला असे. विना नशा, विना अम्मल असं रिकामं मी त्यांना कधीं पाहिलंच नाहीं. माझ्याशीं त्यांनीं लग्न नोंदलं तें सुद्धां माझ्या अट्टाहासासाठीं.

'अर्थातच माझं त्यांचं फार दिवस पटलं नाहीं. मी त्यांना सोडलं. माझ्या आयुष्यांतील नंतरचीं कांहीं वर्षे मी पूर्ण विरक्तावस्थेंत घालविलीं. पण माझ्या आयुष्याचा खेळ अजून

...पान ४९ वर








*सावकारांनीं हरीला प्रत्येक [illegible], विचाराची आणि हरीनें तीं सांगतांच सावकारांनी [illegible] रावी, ह्यांत हृदयाचा मोठेपणा [illegible] होता.*

*साध्या गडीपणाहून सरस [illegible] हरी दांडगा पण धटिंगण नव्हता, [illegible] नरमपणा होता..शब्दांचा गोडवा [illegible]!*

— दत्ता कदम



**सजलेली** हवेली जित नववधूसारखी दिसत होती. हवेलीला रंगहि हिरवाच होता.... जशी भरल्या उरोजावर हिरवी पैठणी. तोरणं आणि झुंबरं दागिन्यांच्याशीच स्पर्धा करीत होती. नववधूच्या डोळ्यांतली नशा हवेलीच्या खिडक्यातून ओसंडत होती. हवेली होती सावकार वानवळ्यांची आणि त्या दिवशीं श्रीमंत पेशव्यांना तिथं आग्रहाची मेजवानी होती. सावकारांच्यापासून फडतूस दासापर्यंत गतीचा कल्लोळ माजलेला होता. सावकार जातीनं कसूं न घालवतां देखरेख करीत होते.

कमरेवर हात घेऊन फिरतां फिरतां सावकारांनीं हांका मारायला सुरुवात केली, 'हरी... हरीरे...अरे गेला कुठें हा हरी ! '

दांडगा असूनहि धटिंगण न वाटणारा हरी हात जोडून सावकारांच्यापुढं उभा राहिला. हरीच्या नजरेंत नरमपणा होता, शब्दांत गोडवा होता, विचारांत निश्चय होता तर भावनेंत माया होती.

' पुढल्या कमानीचें तोरण जरा सरकलें होतें तें जरा सारखें करीत होतो. सावकारांची पत वाढण्यांतच माझ्यासारख्या आश्रिताचें सुख आहे' हरी म्हणाला.

' हरी, तुला बोलतांना ऐकलें, तुला पाहिलें कीं दैवाच्या विपरीत खेळाची आठवण होते. जगाच्या पटांवर तुझी सोंगटी भलत्याच जागीं पडली आहे असें वाटतें. रामः रामौचा तूं पिच्छा पुरवला असतास तर आज लौकिकाला चढला असतास. हरी, पण एक खरे...'





अनुक्रमणिका

'जी'

'शेणांतला किडासुद्धां शेणांत रहात नाहीं. आयुष्यावर श्रद्धा मात्र हवी.'

'मालक, मी ब्राह्मणकुळींचा खरा पण तुमच्या पदरीं असलेला सामान्य नोकर. माझ्या-बरोबर बोलण्यांत असा वेळ घालवूं नये. आपली पत सांभाळणें इष्ट.

'हरी, तुझ्याशीं बोलत रहातांना मला माझी पत आठवत नाही रे. आताचेंच बघ. पुढल्या कमानीचें तोरण सरकलेलें मी मघाशींच पाहिलें होतें. वाटलें कोठल्या सेवकाला याची स्वतःहून जाणीव होते तें अजमावून पहावें. फक्त तूंच एक निपजलास'

'जी'

'हरी'

'जी'

'पंगतीचा पुढा कोठें करावा ?'

'आपण सूज्ञ आहांत. मला पामराला खिजवूं नये.'

'नाहीं नाहीं...तूंच सांग.'

'मीच सांगूं ? नको धनी, फिरत्या चाका-वरच्या माशीला चाक आपल्यामुळेंच फिरत आहे असा अहंकार होतो.'

'नाहीं हरी,...तुझा आचारविचार मी जाणातो...तूंच सांग...तशी पंगत मांडण्याची आज्ञा देईन.'

'स्वामी, मनावर दडपण येतें.'

'सांग सांग.'

'मालक, हंसूं नका...पंगतीचा पुढा पूर्वे-कडे करावा. शुभदिशा आहे ती ?'

'हरी हरी...तुझ्या उत्तरानें मन संतोष पावलें. पंगतीचा पुढा पूर्वेकडे ठेवला जाईल. नामी रंगावली रेखली जाईल. पाटावर बसल्याबरोबर श्रीमंत माधवराव साहेबांचें मन प्रसन्न झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

त्याप्रमाणें सावकार वानवळ्यांनीं भटांना आज्ञा दिलीसुद्धां.भटांना हा प्रकार कळला तेव्हां ते कुजबुजले, 'त्या फडतूस हऱ्याला सावका-रांनीं विचारावें ? आम्हीं काय मेलो ? मग वानवळ्यांच्या सावकारीची पत काय राहिली ? अहो आम्हीं चालत गेलेल्या वाटेनें येण्याची या हऱ्याची लायकी नाहीं...नको नको पुढं बोलणेंच नकों.'

भिंतीला कान असतात हें कांहीं खोटं नाहीं. एका आडोशाला हरीच्या हें सारं कानांत शिरलं. पण त्यानं तें स्वतःपाशीच ठेवलं.

ठरल्या समयाला श्रीमंत माधवरावसाहेब पेशव्यांची स्वारी सावकार वानवळ्यांच्या हवेलीला आली. हाशहुश करीत भोयांनी पालखी खालीं ठेवली. श्रीमंत डौलांत पालखी बाहेर पडले. तुतारीच्या गगनभेदानं सावकारांनीं श्रीमंतांचं स्वागत केलं. स्वतः सावकारांनीं श्रीमंतांच्या पायावर ऊन ऊन पाणी घातलं.

दिवाणखान्यांत कांहीं वेळ दौलतीच्या गोष्टी झाल्या. दौलतीवरून संभाषण घरगुती गोष्टीवर आलं, अगदीं दासदासीपर्यंत.

श्रीमंत म्हणाले, 'कलीयुग कलीयुग म्हण-तात ते तरी काय दुजे आहे. ? आत्तां वाड्या-वरून निघण्यापूर्वीचाच प्रसंग...'

'काय झाले ?'

'एका सेवकानें नारायणरावाची अवज्ञा केली. माझ्यासारख्या दौलतीच्या नायकाला तें कसें खपेल ? त्याला राज्यांतून हद्दपार करण्याची आज्ञा दिली व पालखींत बसलों. प्रत्यक्ष श्रीमंतांच्याकडे ही स्थिती तर सावकार–सरदारांच्याकडे काय घडत असेल !'

'तेंच मी म्हणत होतो. तुम्हींच म्हटलेत म्हणून ठीक. मला नवल वाटतेंऽऽऽ यांना धीर होतो तरी कसा ?'

'छे छे हा धीर त्यांचा नसतो. त्यांचा बोल-विता धनी वेगळाच असतो. वाड्यावर त्या सेवकानें एवढा माजोरपणा दाखवला त्यापाठीं खास आमच्या रघुनाथराव काकांचें कारस्थान असावें.....नाहीं नाहीं आहेच. कोणीकडून आम्हां साऱ्यांचा कोठल्याहि कारणानें अपमान व्हावा हीच इच्छा. अशासाठी सेवक चांगले उपयोगी पडतो.' श्रीमंतांनीं समग्र निरूपण केलं.

सावकार वानवळे पुढं कांहीं बोलण्याच्या पवित्र्यांत होते तेवढ्यांत पंगत सिद्ध झाल्याचा निरोप हरी घेऊन आला. चटकन हरीकडे श्रीमंतांचें लक्ष गेलें. श्रीमंतांनीं कोणताच बरा-वाईट शेरा मारला नाहीं. पण हरीचा शालीन-पणा त्यांच्या नजरेंतून सुटला नाहीं.

श्रीमंतांचा हात धरून सावकारांनीं त्यांना पंगतीकडे आणलें. श्रीमंत नेमलेल्या पाटावर बसले. शेजारी सावकार बसले. इतर मंडळींनीं आपआपले पाट मानमान्यतेप्रमाणें धरले.

अनेक सावकार-सरदारांकडच्या मेजवान्यांची श्रीमंतांना आठवण झाली. तरी सावकार वानवळ्यांकडच्या मेजवानीचा थाट श्रीमंतांना बहुत प्यार वाटला. नीटनेटकी आणि रसिक आंखणी त्यांना आनंदित करूं शकली.

श्रीमंत म्हणाले, 'दौलतीच्या कामांतून असें थोडे बाहेर फिरणें म्हणजे विसाव्याचेंच वाटतें.'

'आपल्या जबाबदारीची कल्पना आहे मला. ...भीतभीतच आपल्याला मेजवानीला येण्याची विनंती केली. श्रीमंतांचे पाय आज हवेलीला लागले...वानवळ्यांचा आज मोठा गौरव झाला असें मी समजतों...' सावकारांनीं विन-यानं शब्द काढले.

सावकारांशीं बोलतां बोलतां श्रीमंतांनीं हलकेंच इकडं तिकडं पाहिलं...खास हरीला







अनुक्रमणिका



अश्रू--

दारावर हलकाहि
फूलमग्न नाद नको
या ढळत्या घनप्रहरीं
शब्दांतुन ये कोणी.

रंग उदा मेघांवर
हंसत फुलत भिजलेला
वाऱ्यावर उडलेला
पक्षी जसा ये सदनीं.

आपुल्याच हातांना
आपुलाच स्पर्श मिळे
सहज तुला बघतांना
अश्रु जसा ये नयनीं.

उत्सव —

अंधार असा घनभारी
चंद्रांतून चंद्र बुडाले
स्मरणाचा उत्सव जागुन
जणु दुःख घराला आलें...

दाराशीं मी बसलेला
करूणेतिल डोळे झांकुन
क्षितिज जसें धरणीला
झाडांनी धरतं उचलुन...

नाहींच कुणी अपुलें रे
डोळ्यांवर नभ धरणारें
दिक्कालं धुक्याच्या वेळीं
हृदयाला स्पंदविणारे...

— ग्रेस

त्यांनी धुंडाळलं. श्रीमंत आपल्याकडे पहात आहेत हें जाणून हरी अधिक ठाकठीक झाला.

हरी सारं निरखीत होता. त्याची ग्रहणशक्ति विलक्षण होती. श्रीमंतांची आकृती त्याच्या मनभर पसरत चालली तशी त्याला सावकारांच्या शब्दांची सारखी याद यायला लागली... तुला बोलतांना ऐकलं, तुला पाहिलं कीं दैवाच्या खेळाची आठवण होते... जगाच्या पटांवर तुझी सोंगटी भलत्याच जागीं पडली आहे असें वाटतें....रामः रामौचा तूं पिच्छा पुरवला असतास तर आज लौकिकाला चढला असतास...हरी पण एक खरें...जी...शेणांतला किडा सुद्धां शेणांत रहात नाहीं...आयुष्यावर श्रद्धा मात्र हवी...खरेंच खरेंच...परवांचं तर पुराणीक बुवांनी कीर्तनांत सांगितलें...अरे मरणाला कसले भिता? त्यापरते आयुष्याला भ्या...आयुष्यच तुमच्या इच्छा-आकांक्षा चिरडून टाकीत असतें...पण पुराणीक बुवांनीं सगळा खुलासा केला नाहीं–पण आयुष्य इतकें कां वाईट असतें ?...मग जगण्याचा मोहच कां झाला असता ?...निरखून पाहिलें तर पदोपदीं वाईटांत चांगलें व चांगल्यांत वाईट आढळतें. कालचीच गोष्ट...सावकारांचा घोडा तुफानला... मिळेल त्याला रस्त्यानें तुडवीत धांवला...एक लेकरूं तुडवलं जाणार होतं पण कोठडींतून नुकत्याच सुटलेल्या चोरानं त्याला वांचवलं... स्वतःचा प्राण धोक्यांत घालून वाचवलं... आणि जातां जातां त्या लेकराच्या गळ्यांतली सोन्याची कंठी पळवायला तो विसरला नाहीं... कंठी नेली तर नेली पण लेकराचे प्राण वाचवले म्हणून त्याच्या आईनें चोराचे आभार मानले ...कांहीहि असो. आयुष्यावर श्रद्धा मात्र हवी.. मग सोंगटीच्या जागेची तमा कसली...

श्री गणेशाय नमः या श्रीमंतांच्या उच्चारानं हरि भानावर आला. श्रीमतांनीं मूद फोडली होती पण राहून राहून त्यांचें लक्ष ठराविक समयीकडे जात होते. श्रीमंतांच्या नजरेचा हरीनें विचार केला. तेवणाऱ्या समयांच्या रांगेकडे पाहिलं. ती ठराविक समयी थोडी उंच होती.

झटकन् हरी पुढं झाला. हरीचं पंगतींत येणं भटांना आवडलं नाहीं पण ते त्याला आवरूं शकले नाहींत. ती समयी हरीनें लगतच्या खळग्यांत सारली. तिची उंची इतर समयांबरोबर झाली.

सावकार म्हणाले, 'अरे अरे हें काय केलं ? पण हरीला उत्तर द्यावेंच लागलें नाहीं.



श्रीमंतांनींच सांगितलं, 'त्याचें करणें अगदीं योग्य आहे. सगळ्या समयांची उंची आता सम झाली. मधाचपासून त्या समईकडे राहून राहून माझें लक्ष जात होतें. सावकार तुमचा सेवक मोठा चतुर आहे बरें कां...'

'होय श्रीमंत, तो सेवक आहेच पण एकेकदां मित्रहि वाटतो' सावकार चांगुलपणानं म्हणाले.

तें ऐकून हरीला गहिंवर आला...पण गळ्यापर्यंतच.

'येथें आल्यापासून माझें लक्ष तर सारखें त्याजकडेच आहे. हा तुमचा सेवक आमच्या अगदीं दिलास आला आहे. माणसाची पारख व्हायला मोठ्याच घटना घडाव्या लागतात असें नाहीं. लहानशा कृतींतूनहि माणसाची पारख होते. सावकार, या सेवकाला आम्ही आमच्या संग्रहीं ठेवावें म्हणतों.' श्रीमंत हंसत म्हणाले आणि त्यांनीं हरीकडे पाहिलं.

आपण कुठें आहोंत याचाच हरीला क्षणभर भ्रम झाला...त्यानं स्वतः चांचपून पाहिलं.

सावकार कांहीं बोलले नाहींत म्हणून श्रीमंतांनीच पुन्हां विचारलं, 'काय म्हणणें तुमचें ?'

'आपल्या शब्दांवर माझें म्हणणें काय असणार सरकार ?' सावकारांनीं उत्तर केलं.

'आमचें मागणें वावगें असणार नाहीं याबद्दल निश्चित असा.'

'होय श्रीमंत. कोणाच्याहि भाग्यांत मी आडवें कां यावें ? सरकार, सेवकाला फडक्यांचा हरी म्हणतात.'

'आपण त्याला हरीपंत म्हणूं. मग तर झालें ?

श्रीमंतांच्या बोलण्यावर सावकार हंसले. मेजवानी हंसली. हरी अतिशयच लीन झाला. भटांचे चेहरे उतरले.

मेजवानी आटोपून परत वाड्यावर जातांना श्रीमंतांच्या लवाजम्यांत एकाची भर पडली... हरीची. आणि हरी...वळकटी घेऊन सावकारांच्या हवेलीहून निघतांना सावकारांच्या पायाचा मुका घ्यायला विसरला नाहीं.

सावकार मागें राहिले. श्रीमंतांच्या समवेत हरीची नवी वाटचाल सुरूं झाली. श्रीमंत माधवराव पेशव्यांची पारख खोटी ठरली नाहीं. वाड्यांतल्या सानथोरांना हरी प्रिय झाला.

हरीवर खुद्द श्रीमंतांची फारच माया जडली. संधीचा फायदा घेऊन हरीनें आपलें ज्ञान वाढवलें. श्रीमंतांनीं त्याला कारकुनीपेशा दिला व प्रत्येक स्वारींत बरोबर घेतलें. यामुळें







अनुक्रमणिका

हरीला लष्करी अनुभव तर मिळालाच पण कारस्थानाचीं धोरणेंहि समजलीं. उत्तरोत्तर हरीचा भाग्याचा तारा उजळला व श्रीमंतांच्याच मुखानें हरीचा हरिपंत झाला. त्याजवर खूष होऊन श्रीमंत पेशव्यांनीं त्यांना आपलें श्रीवर्धनचें खाजगी वतन करून दिलें. इतकेंच नव्हे तर कोंकणचा सुभेदार रामाजी महादेव बिवलकर वारल्यामुळें तो सुभाहि हरिपंतांनाच सांगितला.

श्रीमंतांच्याशीं दौलतीची मसलत करून हरिपंत फडके स्वतःच्या ठाण्यावर नुकतेच परतले होते. जेवणखाण आटोपून सदरेवर त्यांचं पानसुपारी घेणं चाललं होतं. तेवढ्यांत सेवेकरी पुढं आला व लवून म्हणाला, 'धनी, पाचुंदाभर भट आपल्या भेटीची इच्छा धरीत आहेत. देवडीपाशींच ते आहेत. त्यांना काय सांगू ?'

'काय म्हणालास भट आले आहेत ?' पानाची शीर काढतां काढतां हरीपंतांनीं विचारलं.

'होय धनी, भट आलेत. सावकार वानवळ्यांकडची आठवण काढून सारख्या मिटक्या मारीत आहेत.'

'ठीक ठीक, त्यांना सदरेला पाठव.'

सेवेकरी गेला आणि थोड्याच वेळांत पांच-सहा भट सदरेला आले आणि त्यांनीं हरीपंत हरीपंत असें म्हणत हरीपंतांच्या पायाशीं लोटांगण घातलें.

त्या भटांची ओळख पटायला हरीपंतांना वेळ लागला नाहीं.

हरीपंतांनीं सांगितलं, 'हरीपंत नव्हे, हरी हरी'

'नाही नाही...या जिभेला हाड आहे हरीपंत. हरी म्हणायला ही जीभ धजणार नाहीं. आपण थोर भाग्यवान. तुमचा गौरव करावा तेवढा थोडाच आहे. आपल्याकडे आम्हां भटांना आसरा द्यावा.' त्यांतला थोराड भट म्हणाला.

'आसरा ? आणि माझ्याकडे ? तें कसें शक्य होणार ? तुम्हीं चालत गेलेल्या वाटेनें येण्याची या हऱ्याची लायकी नाहीं.'

'नका नका...हरीपंत असें हिणवूं नका. तो आमचा मूर्खपणा होता. नका. आमच्या पोटांवर मारूं नका' भटांनीं पोटतिडिकेनें विनवणी केली.

'कोणाच्या पोटांवर पाय द्यायचा व कोणाच्या नाहीं तें मला पूर्ण कळतें. अहंकाराला प्रायश्चित्त लायेंचच मिळालें पाहिजे, आपण चालते व्हा–' हरीपंतांनीं फर्मावलें.

'पण आमच्या पोऽऽ—'

'चालते व्हा–'

हरीपंतांच्या गर्जनेपुढं भटांचा टिकाव लागला नाहीं. हरीपंतांना दूषण देतच त्यांनीं पोबारा केला.

तोंवर विडा झाला होता; तो हरीपंतांनीं तोंडांत टाकला. विडा चघळतां चघळतां गत आठवणींची त्यांना समाधी लागली. सावकार वानवळ्यांची वडील मूर्ति त्यांच्या मनापुढं ठाकली. नकळत त्यांचे डोळे ओले झाले. श्रीमंतांच्याबरोबर हरीपंत स्वारीत असतांना सावकार वानवळ्यांचें देहावसान झालें होतें. जन्मदाता गेल्याचं ते हरीपंतांना दुःख होतं.

पुन्हां कोणीतरी आल्याचा सेवेकऱ्यानं निरोप आणला. हरीपंतांनीं त्याला सदरेला धाडायला सांगितलं.

सेवेकऱ्यानं त्याला आंत धाडला.

निरोप्या म्हणाला, 'सावकार वानवळ्यांच्या मुलाकडून मी आलों आहे. सावकारांचें उद्यां वर्षश्राद्ध आहे. आपल्याला बोलावणें केलें आहे.'

'बरें येऊं म्हणून सांग.'

दुसऱ्या दिवशीं हरीपंत फडके सावकार वानवळ्यांच्या वर्षश्राद्धाला त्यांच्या हवेलीला गेले. त्यांचं ऊर गच्च भरलं.

पिंडदान झाल्यावर पंगती बसल्या. पण पंगतीला यायला हरीपंतांना थोडा उशीर झाला. कारण सावकारांच्याकडे असतानाची धाबळी व पाण्याचं भांडं शोधण्यांत त्यांचा वेळ गेला. कमरेला हरीपतांनीं तीच धाबळी लावली व त्याच भांड्यांत पाणी घेतलें. तसें ते पंगतीला बसले. हरीपंतांचे डोळे आंतबाहेर कृतज्ञ झाले होते. त्यांच्या त्या विचित्र वागणुकीकडेच सगळ्यांचें लक्ष लागलें होतें.

सावकारांचा मुलगा गंध घेऊन पाणी सोडायला आला तेव्हां हरीपंत त्याला जाहीरपणं म्हणाले, 'चिरंजीव, सावकारांच्या पायाचा मी दास. त्यांनीच मला आयुष्यावरची श्रद्धा शिकविली. त्यांच्या श्राद्धाला बोलावणें घेण्याचा माझा मान नाहीं. यापुढेंहि मी वेळेवर येत जाईन' आणि हरीपंतांनीं माथं खालीं केलं.

त्या शब्दांनीं आंसवांनासुद्धां गहिंवर आला.

## मागें वळून पहा जरा

तूं असा धावणारा
धावणारा
मागें वळून पहा जरा !
मागें मागें-तुझ्यासंगें
ही देवतारूप सुंदरा
धावत आहे...
तुझा पुढे पुढे मोहरा
मागें वळून पहा जरा !

तुझा पतंग उंच जातो
तेव्हां ही दोरी बनून
लवलवत
लवलवत असते;
काटणाऱ्या काट मला
सांभाळ पण या पांखराला
हेंच मनाशीं जपत असते :
त्या भुवन सुंदराला
एक आरती गात असते–
'याचा यज्ञ पुरा करा'
मागें वळून पहा जरा !

औट हातांचा करून कणा
रथामध्यें लपणारी,
रथाबरोबर फिरणारी,
हिला विसरशील
मुशाफिरा,
मागें वळून पहा जरा !

मेघ बनून गगनांतला
ही सावली धरत असते,
तूं तापतांच धार बनून
सर्वांगीं रे तुझ्या बरसते !
तुझा रक्तमाखला हात
विजयध्वजाला पोहोंचताच
ही अक्षता होऊन उधळते
त्या तांदुळांनो लवते धरा
मागें वळून पहा जरा !

— वि. म. कुळकर्णी.







अनुक्रमणिका

रविंद्र पिंगे



**रातचे** दोन प्रहर टळून गेले. सारें उगारगांव शांतपणें झोपीं गेलें होतें. नदीच्या वाहात्या पात्रांत कोंवळें ऊन विरघळून जावें, त्याप्रमाणें रात्रीच्या गडद काळोखांत शांतता एकजीव होऊन गेली होती. सर्व गपगार झालें होतें. झाडें चित्रासारखीं निश्चल झालीं होतीं. डोंगरमाला खांबासारख्या स्तब्ध दिसत होत्या. पान पडलें, तरी आवाज व्हावा असली घन शांतता आसमंत व्यापून राहिली होती.

असें सारें सारें शांत होतें. इतक्यांत हिरू मेंदरकराच्या अंगणांत उंबरठ्यासमोर गांवकोंबड्यानें बेंबीपासून बांग घातली. ती ऐकून हिरू भेदरला नि जाजमावर उठून बसला. दूध फुटावें तशी त्याची झोंप ढेंपाळली. ही ऐन मध्यरात्र आहे, अवेळ आहे आणि अवेळची बांग अपशकुनी असते, हें सारें त्याला क्षणार्धांत जाणवलें. ह्या सर्व विचारानें तो हैराण झाला. त्याची झोंप पांखरागत पळाली. हें असलें लचांड नेमकें आपल्या दारांत आसभास नसतां उभें रहावें म्हणजे दैवानें पुरता दावाच साधला होता, ह्याबद्दल त्याची पुरती खात्री झाली. दैवानें हा दावा कां साधला असेल? ह्या अवचिन्हाचें फळ काय मिळणार? केव्हां मिळणार? नेमकें आपल्यालाच कां मिळणार? ह्या भितीदायक विचारांनीं हिरूचें सर्वांग थरथरून निघालें. कांहीं ना कांहीं स्वरूपांत दुःखाचें ताट आतां आपल्यापुढें वाढून येणार ह्याबद्दल त्याच्या मनांत संदेह उरला नव्हता. ह्या पटकीवर औषध म्हणून त्यानें रामनाम जपलें. मूळ पुरुषाची आठवण केली. वेतोबाला मनांतल्या मनांत गाऱ्हाणें घातलें. सुचलें तसें एक कोंबडेंसुद्धां देवीच्या नांवें देऊन






टाकलं ! भलं एक टुकार कोंबडं गमावलं तरी, पण अपशकुनाचा मळवट भरून गावांत धिंड निघायला नको ! पण त्या जडीबुटीचाहि उपयोग होईना. मनाची उचल उतरेना. उबळ शमेना. दोन पायांची खुडकी करून थरथरत बसलेल्या हिरू मेंदरकराची झोंप जी उडाली, ती उडालीच. डोळे उघडे ठेवून तो काळोख पहात बसला. चित्रविचित्र आठवणींची वटवाघुळं त्याच्या नजरेपुढें फडफडूं लागलीं.

हा अपशकून कशापायीं झाला ? कां झाला ? थोट्या वारुआत्येची शेवटची इच्छा डोईस थापडायच्या थेंबभर तेलावर गेली होती. गोष्ट अवघीं पैशा–दोन पैशांची होती. आपण कनवटी सैल केली असती, तर काय शेरभर जोंधळे जळणार होते ? पण त्यावेळीं तें सुचलें नाहीं. तिचं मोडकं बकोट धरून आपण तिला धुडकावलं नि शेवटीं परिणाम काय झाला, तर तडतडीत केसांच्या जटा वाढवून आत्ये शेवटीं न रडतां बडबडत मेली ! तिनेंच तर हा सूड उगवला नसेल ? कीं खलाटींतल्या काळीला यदा मानाचा नारळ पोहोंचला नाहीं म्हणून धरतीनें कोप केला ? असेल किंवा नसेलहि. किंवा असे असेल, कीं दूधणीच्या आंधळ्या आजोबांच्या हुरड्यांत लहानपणीं आपण माती कालवून ठेवली नि त्यांना घांस लागतांच आपण टाळ्या पिटल्या, त्याचेंच हें प्रायश्चित्त मिळत असणार.

चमत्कारिक आठवणींचा पाट हिरूच्या मनःपटलावरून खळखळून वाहूं लागला. त्याचें जागें झालेलें पश्चातापदग्ध मन तडफडूं लागलें. विव्हळूं लागलें. उगार गावावर रात्र सरत होती. चांदणी कलत होती. वारें फुंफाट सुटलें होतें. तांबडें फुटूं पाहात होतें. आणि अपशकुनाच्या वारानें ठार मुका झालेला हिरू मेंदरकर, पुरतें दिसूं लागण्याची वाट पहात जाजमावर तसाच अवघडून बसला.

अंमळशानें पहाट झाली. पहिला कोंबडा आरवला. त्या मागोमाग गावांतले सगळेच कोंबडे आळीपाळीनें आरवूं लागले. मोठ्या रंगांत येऊन टिपेंत केंकाटूं लागले. त्यांनीं जाग आणली, तशी दोन पायावर अवघडून बसलेल्या हिरू मेंदरकरानें जाजम गोळा केलें आणि त्याचा विस्कळित बोळा कोंपऱ्यांत भिरकावून दिला. नंतर चोर पावलानें तो मागीलदारी गेला. तिथें दगडीवर चढून त्यानें थंड पाण्याचे हबके आपल्या तोंडावर सपासप मारून घेतले. तेव्हां, ताजातवाना होऊन तो अंगणांत आला. अंगणांत उघड्यावर त्याला मोकळें मोकळें वाटलें. पायाखालीं पहिलें दंव सांचलें होतें. कडुलिंबाच्या पानांतं चिमण्या चिवचिंवत होत्या. वर आकाश फुललें होतें. त्यांत टपोऱ्या चांदण्यांचे पुंजके चमचमत होते. रानवेली घमघमत होत्या. बाहेर उघडयावर उभें विश्वजात प्रसन्नचित्त होतें.

मात्र ह्या भल्या रामप्रहरी त्याची लक्ष्मी पारू डोक्यावरून पांघरूण घेऊन माजघरांत घोरत पडली होती. गोठ्यांतल्या ढोरांचें स्पंदन आणि तिचें घोरणें आलटून पालटून लयींत चाललें होतें. देवाघरचा दिवस असा सोनपावलानें आपल्या उंबऱ्यांत चालून यावा नि घरच्या लक्ष्मीनें मात्र बेगुमान घोरत वेळ ढकलावा ? हिरूला ह्यांत स्पष्ट दुःश्चिन्ह दिसलें. तो अंगणांतूनच कडाडला,

' ये माऊले, डोईपार सूर्य आला तरी उठायचं नव्हं कां आतां ? '

हे शब्द ऐकून पारूनें फक्त कूस बदलली. तें पाहून हिरूच्या पायाची आग मस्तकाला झोंबली.

' च्या भले ! बऱ्या बोलानें सांगतूया उठ म्हणून तर बाईल मामलेदारणीवानी कूस बदलून दावतिया ! आतां काय वाजंत्री वाजवूं होय उशापासीं ? '

*आतां सगळं बळ एकवटलंच पाहिजे. जागलंच पाहिजे. अवघ्या एक–दोन तासांचा प्रश्न आहे. तेवढं निभावलं कीं शकुन दर्शन घडणार नि जन्माची ददात फिटणार. आकाशाकडे, रानाकडे, गांवाकडे, काळोखाकडे, ताऱ्यांकडे बघत बघत हिरू क्षण मोजत होता. आतां...*

या आक्रोशावर पारूनें डोळे चोळले आणि ती उठून बसली. पेंगल्या डोळ्यांनीं तिनें जाजमाचा तुकडा गोळा केला. पण तिला धड तोल सावरेना. तेव्हां क्षणांत परत तेंच अंथरूण अस्ताव्यस्त पसरून दगडावर सांवली पडावी, तशीं ती दुसऱ्या क्षणीं गाढ झोपीं गेली. हा सर्व प्रकार पाहून हिरूनें कपाळावर हात मारून घेतला. आतां म्हणावं तरी काय असल्या बायलीला ? हिच्या पायगुणानें म्हणे कणग्यांतल्या धान्याचं सोनं होणार नि ही बारा बारशांची बत्तासीं वाटणार ? कसचं काय नि कसचं काय ! रामपारीं कलागत नको म्हणून त्यानें स्वतःच केर काढला. गोठा साफ केला. शेणनूत पुसलें. ढोरांपुढें पेंढा सारला. पाणी दाखवलें आणि दिवस पुरता उगवायची वाट पाहात तो अंगणांतल्या मेढीला टेकून बसला. कडुलिंबांत चिंवचिंवणाऱ्या पांखरांची भाषा ऐकूं लागला.

आभाळ उजळलं. डोंगर कुठचा, रान कुठचं, कळूं लागलं. आळीतले गोठे जागे झाले. पाणी वाजूं लागलं. धुकं पातळ झालं. होतां होतां सकाळ झाली. शेंदरी उन्हं तिरपी पडूं लागलीं. प्रथम ती रानमाथ्यावर लखलखली. मग मळ्यांत उतरली आणि सगळीं अंगणं उन्हानें धुवून निघाली.

पारूहि जागी झाली. पारोशानेंच तिनें चुलीपाशीं पोतेरें घातलें. दुधाची कथली काढली आणि ती नंतर गोठ्यांत गेली. तिच्या पायरवाबरोबर चंद्रा गाय बाणासारखी ताडकन् उभी राहिली. तिच्या कांसेला पारूनें हात घातला. ढुसण्या मारल्या. चंद्रेची मानहि खाजवून पाहिली. पण इतके लाड पुरवूनहि चंद्रेला पान्हा फुटेना, तेव्हां तिला आश्चर्य वाटलं. कारण इतक्या वर्षांत असें कधींच घडलें नव्हतें. चमचा, दोन चमचे का होईना, पण चंद्री धर्माला जागत होती. मग हें अवचित कसं घडलं ? रानांत हिला कुणाची दृष्ट बाधली का काय ? भ्यालेल्या स्वरांत तिनें हिरूला म्हटलें,

' आवो, ऐकलं कां चंद्रीनं अवचिन्हं ? आज ती दूधच देना ! '

ही करणी ऐकून हिरू जागच्या जागींच बधीर झाला. उमगायचं तें उमगला. मध्यरात्रीं गांव कोंबड्यानें जो प्रताप गाजवला, त्याचें हें पहिलें प्रत्यंतर ! हा म्हणावं आतां फटके पाठीवर. गोठ्यांतली दुभती गाय रातोरात भाकड झाल्याचं कुणाच्या कानं तरी ऐकलयतं काय ? काय बोलावं आणि कुणाशीं बोलावं हेंच त्याला कळेना. ह्या तडाख्यानें पुरता भुईसपाट झालेला हिरू गोठ्याकडे पाठ फिरवून धुक्यांत तरंगणाऱ्या रानाकडे पाहूं लागला.

रिकामी तांबली घेऊन पारू परतली. पुढें आलेला बिनदुधाचा चहा ओरपून हिरूने लालच्या मानेनें शेताची वाट पकडली. जागरणानें











"परत चवथ्यांदा बाबांना माझी मागणी घाल,
तिन्ही वेळां 'एप्रीलफूल' केलंय त्यांनी तुला ! !"

त्याचे जड झालेले डोळे चुरचुरत होते. पावलं तजीत पडत नव्हती. मन तर पार मरगळून गेलें होतें.

काळीवर तुरीची कापणी झाली होती. लाटा बांधून तयार होत्या. फूल झोडायचं होतं. तें काम हिरूनें दणक्यांत सुरूं केलें. हिसक्या हिसक्यानें लाटा पिंजत नि टपोर फूल जमा होई. हां हां म्हणतां त्याची कंबरभर रास झाली. तेव्हां विसावा म्हणून त्यानें पान चोळलं नि सोब-त्याला विचारलं,

'बाजारचं चिन्हं काय व्हणार म्हणतुस ?'

'भक्कम.'

'भक्कम ? अगदीं फौजदारावानी ठोकून दिलं गा !'

'का नाय देयाचं ? फूल तर बेश पडलंयं. झोडायचं, भरायचं नि वोपायचं. गेला बाजार दोन बोटांना मरण न्हाई गड्या !'

हिरूनें पानाची थुंकी टाकली नि तो मनांतल्या मनांत हंसला. दोनशें रुपयांची तहान लागल्याय ह्या बेट्याला. पण आतां ऐकवूं का रात्रीचा फार्स ? मग फुलाचं डोळ्यादेखत खापर झालं तर बोंबलूं नकोस म्हणावं !

तडाखे हाणून हिरूनें आणखी लाटा झोडल्या. फूल गोळा केलं. त्याच्या फांट्या भरल्या. त्या गाडीवर चढवल्या. तोपर्यंत सूर्य चांगला भगभगता डोईवर आला. तेव्हां तो घरीं निघाला. गाडीवानानें त्याला गाडींत बोलावलं. पण त्यानें सोबत टाळली. तो पायींच निघाला. वाट तापली होती. वारं पेटलं होतं. वडावर कावळे मुके झाले होते. वावळं गप्प होतीं. तारांवर देवकावळे डोळे मिटून बसले होते. पण तिकडें हिरूचें लक्षच नव्हतें. सपसप अंतर तोडून तो अंगणांत आला.

त्याला परतलेला पाहिल्यावर पडवींत कलंडलेली पारू सावरून बसली. त्याचें पाऊल पडवींत पडायच्या अगोदरच तिनें सांगितलें,

'अवो गणा तेली गमावला कीं ! कवांपासून वाट बघतायत तुमची बाप्पे. चार निरोप गेल्यायती तुमास्नी.'

झालं ! म्हणजे सकाळीं चहा बोंबलला. आतां ही भाकर बोंबलली. मग काय, द्या आतां गण्या तेल्याला खांदा ! उपाशीपोटीं जा आतां तंगडं तोडीत नदीवर नि बस चार कल्लाक कवटी तडकायची वाट बघत !

नदीकांठच्या स्मशानांत खांद्यावर शेवले टाकून बाप्ये जमले होते. गणा तेल्याचें शव तिथं पडलें होतें. मेल्यानंतरहि गणाच्या नशिबांत ऊन खाणें चुकलें नव्हतें याबद्दल ते हळहळत होते. त्याच्या कर्जबाजारीपणाबद्दल कष्टी होत होते. पण डोईचें मुंडासें खांकोटीस मारून उभ्या असलेल्या हिरूला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. मध्यरात्रीं घडलेल्या अपशकुनाच्या नि नंतरच्या तडाखेबंद प्रत्ययानें तो भेगाळला होता. सगळेजण गणा तेल्यासाटीं हवालदील झाले होते. हिरू स्वतःच्या कर्माचेच अडाखे बांधतां बांधतां भ्रांतचित्त झाला होता. त्यानें संतु कुळकर्ण्याला त्या घोळक्यांतून बाजूस काढलें आणि वडाखालीं नेऊन विचारलें,

'कुरकळणी, जरा वाईच मदत करशाल गा ?'

संतुनें सलामीलाच हिरूला अंगाबाहेर फेंकला. आपल्यापाशीं दमडीहि नसल्याचें सांगून तो चितेकडे निघाला. तशी त्याची बाही खेंचून हिरूनें त्याला परत वडाखालीं नेले नि गयावया करीत म्हटलें,

'असं कसं बोलणं राव तुमचं बी ? पैशाची वार्ता काढलीया का मी ?'

'पैशाची नाहीं तर मग मदत कसची हव्याय तूज ? तुझीं लांकडें तर फोडून मागत नाहींस ना ? भले भामटे झाल्यात तुम्हीं सगळे कुणबी !'

'असं कसं कुरकळणी ? रान आमी तोडावं, तुमी लिवणं करावं.'

'मग तूज हवें तरी काय ?'

'मला भविष सांग नि त्येच्यावर उतारा बी.'

'तें काम पांग्या भटाचें बरें; ह्या कुळकर्ण्याचें नव्हे.' संतूनें रोख-ठोक सांगितलें आणि तो खांदेकऱ्यांत मिसळला. सगळे खांदेकरी ऊन खात पडलेल्या गणाच्या शवाकडे पाहात होते. हळहळत होते. मात्र नवी दिशा गवसलेला हिरू विचलचित्त झाला होता. कोणाचें लक्ष नाहिसें पाहून गणाला भडाग्नी लागायच्या आंतच त्यानें तिथून पाय काढला. कसेंहि करून त्याला पांग्या भटाला गांठायचें होतें.

सरत्या दुपारीं पांग्या जोशी पिंपळाच्या पारावर मांडीभोंवतीं पंचाचा पिळा घालून तळ्यांतल्या पानबगळ्यासारखा पेंगत बसला होता. पेंगता पेंगता बेरक्या नजरेनें समोरची येजा टिपत होता. मसणवटीं-तल्या रण्र उन्हांतून तंगडेतोड करीत आलेल्या हिरूनें पांग्याच्या पुढ्यांत फतकल मारलं, कानाच्या पाळींत अडकवून ठेवलेली आणेली



पांग्याला दिली, रात्रीचा सर्व प्रकार सांगितला नि मग त्यावर उतारा मागितला.

हातांत आणेली पडल्यावर पांग्याची पेंग पळाली. त्यानें आणेली-वरचा छाप बोटांनीं परत परत चांचपडून पाहिला नि ती खरी आहे ह्याची प्रथम खात्री करून घेतली. हिरू त्याच्याकडे आशेनें पाहूं लागला तसे पांग्यानें डोळे मिटले. ओठ हलवले. भुंगा गुणगुणावा तसा तो घुमूं लागला. तो पुटपुटतो आहे तो मंत्र असावा हें हिरूनें ओळखलें. पांग्यासारखेंच त्यानें आपलेंहि डोळे मिटून घेतले. पांग्याची वाणी त्याच्या कानावर आदळूं लागली,

‘ हिऱ्या, लक्ष देवून ऐक. वेशीवरचा वेतोबा माझ्या वाचेकरवीं बोलतो आहे ! ’

वेतोबाचें नांव आल्याबरोबर हिरूनें भक्तिभावानें नमस्कार केला व तो ऐकूं लागला.

‘ आज रात्रीपासून पंचमीच्या पहाटेपर्यंत रात्रीचं आभाळ बघ. तारा न तारा निरख. एकटा बघ. वाटल्यास सोबत्यांबरोबर बघ. पूर्वेला सात तारे उगवलेले दिसतील. तुझं संचित असेल, पुण्य असेल वाडवडिलांची, पोराबाळांची, पुण्याई असेल तर ते सात तारे बघतां बघतां तुला साक्षात्कार होईल !’

‘ च्या ! खरं कीं खोटं ?’ हिरूनें न राहवून विचारलें.

‘ भटाचं रे काय अडलंय खोटं सांगायला ? लिहून घे माझे शब्द ! मी सांगतो, तुला साक्षात्कार होईल. त्या सात ताऱ्यांच्या पोटांत एक तारा खर्रकन गळून पडतांना दिसेल. तो दिसला रे दिसला कीं घडलाच गड्या शकून !’

‘ अगदीं खरं म्हणायचं का ?’ हिरूनें काकुळतीनें विचारलें. त्यावर पांग्यानें टांसून सांगितलें,

‘ लेका आतां गुदगुल्या होतायत तुला, पण उद्यां लाखाचा पार्टी झालास नि अडत थाटलीस म्हणजे ओळख देणार नाहींस पांग्याच्या बाला पण ! अरे, शकुन म्हणजे जादू आहे जादू !’

‘ पन समद्यांना फळंल व्हय शकून ?’

‘ बोलण्यांत वेळ घालवूं नको मूर्खा. माझा शब्द म्हणजे रामबाण. पळ !’

‘ आनि परसाद ?’

‘ प्रसाद ? सालं सगळंच मुसळ केरांत कीं रे ! जा. धांव. इथून जातांना तुला जी पहिली तुळस दिसेल, तिची पानं खुडून तोंडांत टाक. तोच प्रसाद ! सांगतो ना, अगदीं अमृत होईल ! पळ लवकर पळ. ’

भान हरखलेला हिरू हें ऐकतांच वाडीच्या दिशेनें धूम पळाला.

नव्या शकुनाचें शुभवर्तमान दहा तोंडीं झालें. पारूला सारें प्रकरण ऐकूनच आभाळ ठेंगणें झालें. काहीं टग्यांनीं हिरूला भोट म्हटलें, मात्र चार पावसाळ्याचं पाणी चाखलेल्या बाप्यानीं माना डुलवल्या. म्हातारे कोतारे गहिंवरले. हिरूनें उभा गांव हांकारला. त्या शकुनाच्या बातमीची खिरापत सर्वांच्या हातावर टेकली. उभा गांव शकुन दर्शनाला तयार झाला. रातच्या चुळा भरून झाल्यावर सर्वांनीं लेझीम खांद्यावर लटकावली. हासत खिदळत पार्टी टेंभ्यावर निघाली. सर्वांपुढें होऊन हिरू चूड दाखवत होता. पारूनें डोक्यावर लखलखीत कळशी घेतली होती. सारे झपझप चालले होते. जें कांहीं शुभ व्हायचं होतं तें चार दिवसांत होणार होतं. नशिबाचा चमत्कार होणार होता. जन्माची ददात मिटणार होती. माप तिथं रोवळीं





अनुक्रमणिका

शेवळा तिथें कणगा होणार होता. चाराचे चव्वेचाळीस होणार होते. रंकांचे राव होणार होते.

गाजत वाजत पार्टी डोंगरीवर चढली. तिथून वर आभाळ कसं लख्ख दिसत होतं. दिशा स्वच्छ झाल्या होत्या. पूर्वेला सप्तर्षींचे सात तारे हिऱ्यासारखे चमचम करीत होते. त्यांच्याकडे डोळेभर पाहून हिरूनें हात जोडले. लोटांगण घातलं. त्याचं पाहून इतरांनीहि भराभर लोटांगणं टाकलीं. मग बसाबस झाली. सर्वांचे पुढये सात ताऱ्यांकडे होते. प्रत्येकजण त्या सप्तर्षींकडे डोळे फाटेस्तोंवर पाहात होता. अधून मधून तारे तुटतांना दिसत. पण सप्तर्षींच्या पोटांत नव्हे. दुसरीकडेच कुठें तरी. असें झालें कीं मंडळी चुकचुकत. दूध फुटावं तसा त्या चुकचुकण्यानें घन शांततेला तडा जाई.

दोन तास बरे गेले. मग सदु न्हावी कुरकुरायला लागला. आधल्या रात्रीं वरातींत त्यानें तीन तास बत्ती धरली होती. त्यानंतर पहाटेपर्यंत भजनांत टाळ धरला होता. त्या त्रासानें त्याचं रिकामं पोतं झालं. बघतां बघतां तो कलंडला. आडवा झाला नि मारे रंगात घोरूं लागला. त्याच्या घोरण्याला सगळेजण हंसूं लागले. पण हसतां हंसतां सुनकांत असलेला नामा तेली पेंगू लागला. तोहि पेंगतां पेंगतां कलंडला नि हंसत हंसत झोपीं गेला. ! त्या दोघांची चेष्टा करत पार्टीनें कशीबशी पहांट गांठली. डोळे फोडफोडूनहि त्यांना शकून दिसला नाहीं. शेवटीं पहिल्या कोंबड्याची बांग ऐकून सारेजण काळोखांत बुडालेल्या गावाकडे परतले.

दुसऱ्या रात्रीं मुंडासें बांधून हिरू खळ्यांत येरझारा घालूं लागला. सोबत्यांची वाट पाहूं लागला. बराच वेळ झाला तरी कोणीच उगवेना. म्हणून त्यानें भाकर तुकडा खाल्ल्यासारखं केलं. हातावर पाणी टाकलं आणि परत येरझाऱ्या घालायला सुरवात केली. बराच वेळ जाऊन रात्र चढल्यानंतर दहा–बारा गडी जमले. आधल्या रात्रीं आलेल्यापैकीं निम्मे गळाले होते. त्यांची वाट पाहण्यात आतां अर्थच नव्हता. त्यांच्या नशिबींच जर शकुनाचं दर्शन नसेल तर आपण आटापिटा करण्यांत तरी काय अर्थ आहे ? सर्वांच्या हातावर थोडीच रेघ उमटते ? तेव्हां अधिक कुणाची वाट न बघतां त्या बारांची पार्टी खांद्यावर लेझीमं अडकवून तारे टिपायला निघाली. हिरूनें चूड दाखवली. पारूनें डोईस कळशी घेतली. हंसत, खिदळत, गळलेल्याची टवाळी करत, पार्टी शेतावर आली. टेंभावर चढली. हुश्शार झाली.

रात्र चढली होती. वारा वाहात होता. गांवरान काळं काळं झालं होतं. आभाळ निळं होतं. त्याच्या पूर्वेला सप्तर्षींचे सात तारे चमचम करीत तेजाळत होते. त्यांचं मंद तेज पिवून पार्टी आधल्या रात्रीं तृप्त झाली होती. त्यामुळें आतां नव्या दर्शनांत नव्हाळीचा जोष नव्हता. झाड बघतो, ओढा बघतो, दगडधोंडा बघतो, तसंच हें एक नुसतं बघायचं दृष्य होतं. पण शकुनाचं टिपण नेमकं त्या सात ताऱ्यांच्या पोटांत ठरलं होतं. म्हणून सर्वांच्या नजरा तिथं खिळल्या होत्या.

तारे टिपून सारे कंटाळले तसं विठू माळ्यानें मेंड्य। लावायचा बूट काढला. त्यानें पहिली आर्या खणखणांत स्वरांत ठोकली. पण दुसरी कविता कुणालाच न सुचल्यानें त्यालाच तीहि म्हणावी लागली. शेवटीं अशा प्रकारें त्याला येत असलेल्या दहा पंधरा कवितांचं ओरडणं झाल्यावर त्याचा उत्साह संपला. सर्वांनीं जेमतेम मध्यरात्रीपर्यंत धीर धरला. रात्र तर अशी उलटून गेली पण शकुनाच्या सांवलीचाहि पत्ता नव्हता. सारेजण चुळबुळूं लागले. गेंगाण्या पाटील स्वतःवरच डाफरूं लागला,

'सालं आमच्या नशिबांत फक्त जागरणच दिसतयसा !'

हिरूनं त्याला चेंपलें, 'काय पन अक्कल धांवतीया पाटलाची ! येवढं भटानं भविष्य केलं तें फुकाट गा ?'

'अरे गप रे हिरबा. लेका चांगलं दिवस यायचे, तर आतापर्यंत दोन रातीं कां रे शिमगा केला ? नि येवढा शकुन दिसणार दिसणार म्हणतुया तर मग पांग्या भट कां न्हाई आलाया ? तें कांहीं न्हाई. पार्टी, आपुन आतां दोन हात लेझीम मारूया. साले बक्कल दोन राती भाकड गेल्या. आतां अर्धा–पाव कल्लाकानें शकून थोडाच निसटतुया ?'

पाटलाच्या अकलेची सर्वांनीं तारीफ केली. त्याला मूर्खांत काढला. दाढेखालीं तंबाखु धरण्याचा सल्ला दिला. पाटलानें पार्टीला मूर्खांत काढली. पाय पोटासी घेतले आणि डोळे मिटून तो चक्क डुकरासारखा झोपीं गेला. त्याच्या घोरण्यानें पार्टीची करमणूक केली. ती करमणूक त्यांना सकाळपर्यंत पुरली. गोविंद सुताराला मात्र वाटत होतं, सालं आपण पण लवंडलो असतो,तर बरं झालं असतं. शकुनापरी शकुन बोंबलला नि पदरीं पडलं जागरान !

तिसऱ्या रात्रीं पार्टी गोळा करायला हिरूला आळींत हाळी घालावी लागली. परत परत पुकारे घालावे लागले. दोन रात्रींच्या जागरणांची ओझीं वाहिलेले जवान घरोघर मस्त ढाराढूर झाले होते. डोक्यावरून कांबळी पांघरून मेल्यागत झोंपले होते. हिरूची हांक ऐकल्यानंतर एक–दोघांनीं हुंकार दिला. पण उठून मुंडासं बांधण्या ऐवजीं त्यांनीं फक्त कुसी बदलल्या. अवघीं पांच टाळकीं शब्दाला जागली. मोट ओढणाऱ्या बैलांसारखे ते बळ एकवटून चालूं लागले. सर्वांपुढें होऊन हिरूने चूड धरली. पारूनें डोईवर घागर घेतली. पार्टी गुपचूप शेतावर आली. टेंभावर चढली. त्यांच्यासमोर काळ्या रंगाचा समुद्र पसरला होता. वर आभाळ स्वच्छ निळं दिसत होतं. पूर्वेला सात ताऱ्यांचं कासव पोहत होतं. त्याला टिपत सारेजण रात्रभर जागले. आणि दिवस उगवल्यावर लटपटत्या पायांनीं परत आले. त्यांतल्या दोघांनीं कानाला कायमचा खडा लावला कीं तारे जरी भुईवर उतरले तरी त्यांना निरखायसाठीं जागरण म्हणून कसें तें करायचें नाहीं !

चौथ्या रात्रीं तर अवघीं दोन टकलीं हिरूच्या साथीला होतीं. पैकीं एक घरचंच, म्हणजे पारूचंच होतं. ते तिघेजण टेंभावरचा वारा खात तारे निरखीत बसले. आणि उजाडलं तसे झुकांड्या देत देत घाईस परतले.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



आज पंचमीची पांचवी रात्र. जें कांहीं दिसायचं होतं तें दिस-ण्याचा आजचा शेवटचा दिवस होता.

चार रात्रींच्या जागरणांच्या गोण्या वाहून हिरूचा चेहेरा पुरता भेसूर झाला. दिवसा उजेडीं शेतकाम, दुपारीं गांवकाम नि रात्रीं ताठ बसून तान्यांवर पहारा. ह्या सगळ्या रामरगाडयांत तो गडी पुरता जेरीला आला. भुईला हात लावून उठूं लागला. घरांत चालतांना आधाराला भिंत धरूं लागला. येरव्ही त्यानें अंथरूणच पकडलें असतें. पण आज पंचमीची शेवटची रात्र होती. शकुनाची शेवटची घडी होती. निदान हा तरी लाख मोलाचा मोका कुणीं वाया घालवूं नये असं त्याला वाटलं. त्यामुळें सकाळीं साऱ्या आळीभर आवंतण देऊन त्यानें पदर पसरला.

सदु न्हावी खुंटावर हत्यारं मांडून उन्हाच्या कवडशाची वाट पहात बसला होता. पहिलीं पिवळीं धम्मक उन्हं त्याच्या ओटीवर चढलीं कीं त्याच्या गिऱ्हाईकीला सुरवात होई. सदूची दृष्टी दाढीचे खुंट वाढलेल्या हिरूवर गेली. भाळावरल्या आठ्यांच्या पाटांतून नाखुषी खेळवत त्यानें हिरूला विचारलें,

'काय गा, पावला का पांडबा भट नवसाला? न्हाई, सोन्याचा पेंढा शाकारणार हुतास म्हणून इचारतो!'

हिरूला सदूची दया आली. आतां ह्या न्हाव्याला काय म्हणावें? पावायचाच असेल तर देव पावेल; वेतोबा पावेल; पांग्या भट पावणार नाहीं. नि समजा न पावला देव तर इथें कुणा लेकाच्यानें नवस घातलाय? बोलून चालून हा साधा शकुन दर्शनाचा मामला; अपशकुनावर उतारा. ज्याची पुण्याई असेल त्याला तो जरूर दिसेल. ज्याची नसेल, त्याचं जागरण फुकट जाईल. पण ज्याला दिसेल तो? तो ह्या सदु न्हाव्याला सोन्याचा वस्तरा देईल नि वर रुप्याची पेटीहि देईल! सालं आहे काय नि नाहीं काय? नि, भले नाहीं दिसला आम्हांला शकुन, तर काय हा सदु न्हावी नारायणाची पूजा घालणाराय? कीं व्रतासें वाटणाराय? पण इतकं डोचकं असतं तर सदु न्हावी मामलेदार का न होता? त्याच्या प्रश्नाला झटकत हिरू म्हणाला,

'लेका सदथा, आमची आपली विच्छा होती कीं सदबाच्या हातांत माणकाचं कडं दिसावं, कानांत भिगबाळी दिसावी! पर तुझ्या नशिबीं लिवलाय उघडा वस्तरा! तिथं कुणाचं काय चालतयसा?'

या उतान्यानें सदु न्हावी गप्प झाला. छातीवरचे केंस तोडूं लागला. उन्हाच्या कवडशाची वाट बघूं लागला.

नंतर हिरूनें बरीच तंगडेतोड केली. सदूच्या खुंटावरून तो नाम्या सुताराकडे गेला. त्याचा नन्ना कनवटीला लावून मेस्त्रीकडे गेला. तिथला नकार ऐकून श्रीधर वाण्याकडे टेकला. तिथून घरवार भटाळी करून पुढें रखु मास्तराकडे डोकवला. तिथें मास्तरांचं विलायती कुत्रं गुरगुरूं लागल्यामुळें तो पुढें झाला नाहीं. शेवटीं सगळ्यांचा नन्नाचा पाढा ऐकून कडकडीत उन्हाची पिशवी पाठीवर टाकून तो घरीं परतला.

घराच्या पडवींत पारू पारोशानेंच आडवी झाली होती. घरांतल्या लक्ष्मीची ही अवदशा पाहून त्यानें कपाळावर हात मारून घेतला. डोईचें मुंडासे रागाच्या भरांत सोडवून घेतलें आणि पारूच्या दिशेनें तें भिरकावींत तो कडाडला,

'च्यायची! काय पण बाईल भेटलीया नवलाईची! चार रातीं जागरणं केलं न्हाई तर लागली का ढोरागत लोळाया! हात त्येचा—'

'काय बी म्हना तुम्हीं, पन प्रान गेला तरीबी मी न्हाय जागा-यची आतां! तुमीच भेटा शकुनाला नि शकुन भेटूं द्या तुमाला.' पारूनें चोख सांगून टाकलें.

'ठरलं का! बोटभर उरलयां आतां तर लावलीयाका सुरुंग!'

'सुरुंग का तुरुंग, तुमचं तुमीच बघा नि जागा. चार राती टक्कुर जागलूया डोळं फुटेस्तों, तर शकुनाचा न्हाई पत्ता!'

'अग पन दमान घेशील का न्हाई?'

'दमान? ते ओ कशापायीं? मेजून चार रातीं वारं खालं थाड-थाड तरी तुमच्या शकुनाचा नाय पत्ता. आतां नगा लोकास्नी तर्रास देऊं नि तुमीबी झोंपा बक्कळ चार कलाक. त्यो भट एक खुळं नि तुम्हीं सात खुळं! म्हणं, शकुन दिसतीया ऽ लक्ष्मी फिरतीयाऽऽ फिरती होतीयाऽऽऽ'

'बरं का लक्ष्मे, न यांचं तर नग येवूं तूं. बळजबरी न्हाई. पण चालणारेचा पायात कांटा नको घालूं. आपुन म्हंजे शब्दाला मामलदार! दिल्हं ते दिल्हं. बोल्लं ते बोल्लं.'

'मग जा बेश रानांत नि परतां परत इचू डकला म्हणून.'

'कसचा डकतूया इचू नि फिचू? आपुन जाणार ऽ. अगदीं एकटं जाणार नि कोंबड्या अगुदर गोड सागाया येणार! तेवा आरत आणूं नका सामोरी म्हंजे झालं!'

पारूनें हिरूच्या बावळेपणाची कींव केली. हिरूनें पारूसकट सर्वांच्या कर्मदरिद्रीपणाची कींव केली. पदरांत पडला तो भाकर तुकडा खाऊन तो हुशार झाला. वेतोबाचें नांव घेत त्यानें कळशी खांद्यावर घेतली. एका हातांत चूड घेतली आणि संपता न संपणारी वाट तुडवत तो शेतावर आला. तिथून टेंभावर चढला.

वर निळं निरभ्र आकाश विस्तारलं होतं. गांवरान काळं कुट्ट झालं होतं. थंडगार वारा घों घों वाहत होता. पिंपळपानं गाजत होती. पूर्वेला सप्तर्षींच्या सात ताऱ्यांची टप्पोरीं फुलं तेजानें चमचमत होतीं. त्यांच्या भोंवतीं दुधाळ चांदण्याचा सडा पडला होता.











सृष्टीचें तें भयाण विक्राळ रूप पाहून हिरू चरकला. काळोखाच्या अनाद्यनंत सागरांत आपण एकट्यानेंच गटांगळ्या खात आहोंत असें त्याला वाटलें. निदान बांधावरल्या त्या प्रचंड पिंपळानें तरी आपली गाज बंद करावी नि स्तब्ध होऊन आपल्याला साथ द्यावी असें त्याला वाटलें. पण तें होणें शक्य नाहीं हेंहि त्याला पुरतें माहीत होतें. भिंतीच्या खळ्यांत मन मेढीसारखं रोवून तो त्या सात ताऱ्यांकडे लक्षपूर्वक पाहूं लागला. थंडगार वाऱ्याच्या पुष्पलाटा येत आणि त्याच्या अंगांवर फुटत. हिरव्या कंच पानांचा आणि कळ्यांचा वास धांवत धांवत येई आणि त्याच्या गळ्यांत गळा घाले. आभाळाचा निळा, काळा, जांभळा रंग गरगरत खालीं उतरे आणि त्याच्या शिणलल्या नजरेवर फुंकर घाली. वाऱ्या, कां रे असा लडीवाळपणा करतोस ? सुगंधा, आज तूं जागा रे कां ? रंगांनो, अशा गडद रंगाच्या तळव्यानीं डोळे झापणं बरं नव्हे—

मोहाच्या प्रत्येक लाटेला हिरू टक्कर देई. मोठ्या कष्टानें डोळे उघडे ठेवी. अशा वज्रनिग्रहांत पहिला गार प्रहर संपला. त्यामागोमाग दुसराहि तसाच गेला. आजचा शेवटचा दिवस. खरें म्हणजे शेवटचे तास; थोडीशीं घंटा-पळें. आतां डुलकी उपयोगाची नाहीं. भुवया विस्फारून चार हात मारलें कीं पलीकडचें तीर गांठलेंच म्हणून समजा. नशीब परीक्षा घेत आहे. नियति लगाम सैल सोडत आहे. आतां ह्या क्षणाला कच खाल्ली कीं साऱ्या जन्माची फटफजिती झाली म्हणून समजा. आतां सगळं बळ एकवटलंच पाहिजे. जागलंच पाहिजे. अवघ्या एक-दोन तासांचा प्रश्न आहे-आहे-नाहीं नाहीं. तेवढं निभावलं कीं शकुन दर्शन घडणार नि जन्माची ददात फिटणार. आकाशाकडे, रानाकडे, गांवाकडे, काळोखाकडे, ताऱ्यांकडे बघत बघत हिरू क्षण मोजत होता. आतां नव्वद मिनिटं उरलीं, आतां साठ उरलीं आतां चाळीस उरलीं. आतां—

मात्र वेळ जाऊं लागला, तसा डोळे धड उघडे ठेवण्याचा ताणहि त्याला असह्य होऊं लागला. तशांत ताज्या रानवाऱ्याचीं बोटं त्याचा थकलेला चेहरा कुरवाळूं लागलीं. तें सुख त्याला काबीज करूं लागलें. त्यानें आपले थकलेले डोळे सात ताऱ्यांच्या पोटांत रोखले. पण थंडगार वाऱ्याच्या स्पर्शसुखाच्या पडद्याआडून त्या सात तारकांचं रूपच त्याला हळूंहळूं दिसेनासं झालं. टपोरे तारे अंधुक अंधुक दिसूं लागले. त्याचे डोळे पेंगूं लागले. शरीर झोकें घेऊं लागलं. तुळं पडलं. त्यानें डोळे उघडण्याचा एक क्षीण प्रयत्न केला. पण इतक्यांत ताज्या नि ओल्या रानवाऱ्याची एक गुबगुबीद लाट सुगंधाचे शेले माळून मुरडत मुरडत आली आणि आपला कृपाळू केशकलाप तिनें हिरूच्या मानेखालीं दिला. पांच दिवसांचे कष्ट आणि पांच रात्रींचीं जागरणं यांनीं पुरतें पोखरलेलें तें दुबळें शरीर थंड मोकळ्या रानवाऱ्यापुढें लीन होऊन, वेलीवरून पडणाऱ्या फुलाप्रमाणें हलकेंच जमिनीवर पडलें. सुगंधासारखें ऐसपैस पसरलें.

आभाळ निळं निळं होतं. गांवरान काळं काळं होतं. रानवारं झुळूंझुळूं खेळत होतं. दुधाळ चांदण्याच्या पुष्ट फांदीवर सप्तर्षींची टपोर फुलं डुलत होती. आणि त्या कनवाळू निसर्गाच्या मांडीवर हिरूचा थकला देह शांतपणें झोपीं गेला होता !

पहांट होतांच घरटीं सोडून पाखरं मळ्यांत उतरलीं. गुरं शेताला लागली. घारी घिरट्या घालायला लागल्या. पण हिरूला त्याची दाद



—'लोक रंग न टाकतां गेलेत, पण जरा आरशाकडे तरी बघा...

नव्हती. बावींतल्या बेडकासारखा तो गपगार झाला होता. सकाळ झाली. हळूं हळूं उन्हं तापलीं. भुई तापली. पेटलेला वारा भणभण वाहूं लागला. चढतां चढतां सूर्य डोईवर आला. चावू लागला. तेव्हां हिरूला अंधुकशी जाग आली. सूर्याची चाहूल लागली. डोळे न उघडतांहि त्यानें ओळखायचें तें ओळखलें आणि डोळे गच्च आंवळून घेत कपाळावर थाड थाड हात आपटत स्वतःलाच विचारलें, 'काय गा, आतां गावांत दावाया तोंड हाय का तुला ? अं ? आता काय सांगनार त्येंना ? आतां बऱ्या बोलांनं गांव सोड आनी पळ !' ●

**आलिंग्न**

मधाळ मनाच्या
तुझ्या पापणींत
स्वप्नांचें संगीत
पाणावलें

तिमिरासारखें
चंचली चोपत
प्रकाश-कवेंत
विसावण्या

अंधारानें किंवा
रडावें कुशीत
प्रकाशाची ज्योत
वेगळीच !

—विजय सुराणा





अनुक्रमणिका



*असंख्य वाचकांना आणि टीकाकारांनां आवडलेली ही लेखमाला या अंकांत पुरी होत आहे. कित्येकानी ती पुस्तकरूपानें कधीं प्रसिद्ध होणार अशीहि पृच्छा केली. एकंदरींत या लेखमालेनें आमच्या अपेक्षेप्रमाणें बराच गाजावाजा केला. लेखक याबाबतींत धन्यवादास पात्र आहे. वाचकांनीं आपलीं मतेंहि आमच्याकडे पाठवावींत. योग्य विचार केला जाईल.*

# हा जय तुमचें कल्याण करो !

—आत्माराम नीलकंठ

**श्रेयसे नो जयो भूयात् ।।४०।।**

**हा जय तुमचें कल्याण करो.**

उत्कृष्ट औषधी गूण असलेली वनस्पती अ-योजकाच्या हातांत पडली कीं वीष बनते. आपलें कल्याण करण्यास समर्थ असलेल्या महाभारताची आपण अशीच गत केली आहे. हा व्यवहारवेद आपणास लाभूनही आपण दुर्दैवानें त्याचा आपल्या कल्याणासाठीं उपयोग करून घेऊं शकलेलों नाहीं. कृष्ण हाच भारताचा प्रतिपाद्य विषय असून त्याच्याविरुद्ध जो युधिष्ठिर तो आदर्श नव्हे असा ठाम निर्णय झाल्याशिवाय महाभारत आपलें कल्याण करूं शकणार नाहीं. जोंपर्यंत या मूळ मुद्यावर आपला बुद्धिभेद आहे तोंपर्यंत आपणास मार्ग दिसणें कठीण. बुद्धिभेद उत्पन्न करणारीं साधनें महाभारतांत ज्यांनीं घातलीं त्यांना सुदैवानें व्यासाबद्दल निरतिशय आदर असल्यानें त्यांनीं बहुधा व्यासानें लिहिलेलें कांहींही न गाळतां अथवा न बदलतां आपणास वाटली ती भर त्यांत घातली आहे. या भरीचे सांधे सर्वच ठिकाणीं नीट जुळले आहेत असें नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं तर स्वच्छ विसंगती राहून गेली आहे. याचें एक उदाहरण म्हणजे, 'संजय हा धृतराष्ट्राजवळ बसून होता आणि त्याला दिव्य दृष्टीनें सारें दिसत होतें' आणि 'संजय रणांगणावर लढत नसून महत्वाच्या घटना घडल्या कीं जाऊन धृतराष्ट्रास सांगत असे' हीं वर्णनें होत. यांतील पहिलें वर्णन महाभारतांत पारलौकिक मसाला ओतणाऱ्या पुराणिकाचें आणि दुसरें वर्णन इतिहासकाराचें हें उघड आहे. महाभारताच्या नमनांत नमस्कार केला आहे तो कृष्णाला आणि अर्जुनाला आहे, युधिष्ठिराला नाहीं. महाभारताच्या निबिड जंगलांतून ज्या अशा प्रकाश शलाका दिसतात त्यांचा मागोवा घेत त्या जंगलांत धिटाईनें प्रवेश केला तर ज्या मार्गानें इतिहासकाराचें गमन झालें तो कमि-अधिक प्रमाणांत स्पष्ट व्हावयास हरकत नाहीं. आणि तो स्पष्ट झाल्यावर या जयग्रंथानें आमलें कल्याण व्हावयास हरकत पडूं नये.

इतिहासकाराचें गमन घडलें तो मार्ग एकदा हातीं आल्यावर वाटेंत अद्‌भुतता आणि कल्पकता याचा मोह पडून आपण चळतां नये. पारलौकिक तत्वज्ञानचें दडपण आणण्यासाटीं जो अद्‌भुततेचा उपयोग केला जातो तो अश्रेयस्कर आहे. अति मानुष सामर्थ्याच्या भीतीनें अथवा बाबावाक्यं प्रमाणं या न्यायानें मनांत रुजविलें जाणें यांत कोणत्याही तत्त्वज्ञानास गौरव नाहीं. तत्त्वज्ञान पटविण्याचा हा मार्ग यशस्वी ठरला तरी गौण होय. विचारांतीं पटलेल्या समजुतीमुळेंच तत्त्वज्ञान मनांत रुजावयास हवें. अद्‌भुत अशा विराट रूपांतील कृष्णाच्या दर्शनानें थक्क झाल्यामुळें कृष्ण मोठा वाटणें आणि ज्या गुणांत कृष्णाची विराटता सामावली आहे ते गुण आपल्या बुद्धीला पटल्यानें कृष्णाचें मोठेपण पटणें यांतील दुसराच मार्ग कृष्णास कमी अन्याय करणारा आणि त्याचा अधिक गौरव करणारा आहे.

अद्‌भुताची ऐतिहासिकता जे पटवूं इच्छितात ते संमोहन जादुगिरी इत्यादी आजही दिसणाऱ्या गोष्टीचा आधार घेतात. तमूक जादूगार शून्यांतून धन निर्माण करतांना अथवा मनुष्य चिरून पुन्हां जोडतांना आपण पहातों. मग कृष्णानें गोवर्धन उचलिला अशा गोष्टी खऱ्या कां नसाव्या ? या विधानांतील तर्कदुष्टता थोडेसे खरवडतांच दिसणारी आहे.









अनुक्रमणिका

शून्यांतून लाख रुपये उत्पन्न करून दाखविणारा जादुगार लगेच पोटासाठीं चार आण्याची बिदागी मागत असतो. मनुष्य चिरण्याच्या प्रयोगांत त्याचें बोट चिरलें तर त्यासाठीं त्याला प्रयोग बंद ठेवून बोट जोडून घेण्यासाठीं शस्त्र-वैद्याकडे जावें लागतें. जादुगारानें उत्पन्न केलेल्या धनास शून्याचीही भौतिक किंमत असती तर विश्वाचें अर्थशास्त्र कधींच कोलमडतें. जादुगाराचे चमत्कार आपली डोळेझांक करीत असले तरी ते असत्य आणि भ्रामक असतात. ईश्वराच्या नांवावर घातलेले चमत्कार जर असे भ्रामक आहेत असें म्हणणें असेल तर मग वादच नाहीं. पण गोवर्धन पर्वत उचलल्यामुळें पावसापासून रक्षण झालें असे भौतिक परिणाम जर त्या आध्यात्मिक चमत्कारांतून कल्पावयाचे असतील तर त्यावर विश्वास ठेवणें कठीण आहे. असे चमत्कार हे कृष्णाच्या मुखांतील तत्वज्ञान अज्ञांस पटावें या उद्देशानें त्याला देवत्व आणण्यासाठीं कल्पिलेल्या भाकडकथा होत. त्यांना डावलूनच इतिहासाचा मागोवा घेणें बरें.

विज्ञान आणि रसायन अशा भौतिक शास्त्रांतही पूर्वी बेफाट प्रगति झांली होती असें भासविणाऱ्या विमानें आणि अस्त्रें इत्यादी गोष्टी याही बहुधा अस्फुल्कट कल्पना शक्तीचीच फळें होत. विश्वाची प्रगति ही सतत आध्यात्मिकतेकडून भौतिकतेकडे होत आहे असाच तिचा आलेख आहे. कालची आध्यात्मिकता आज नाहीं व आजची भौतिकता काल नव्हती. हेंच विश्वाच्या ज्ञानाचें प्रत्येक दिवसाचें स्वरूप होय. त्यामुळें पूर्वकाळीं आपली आध्यात्मिक पातळी अधिक उच्च होती हें खुशाल मान्य केलें तरी विमानें अथवा अणुगोल यांचें आपणास ज्ञान होतें अशी भौतिक उच्चतेचीं लक्षणें दाखविणारीं वर्णनें हीं केवळ उत्कट कल्पनेचीं फळें होत हेंहीं आपण जाणावयास हवें. इतिहासकार ज्या मार्गानें फिरला त्याचा परिचय होण्याची शक्यता ही आपण अद्‌भुतता आणि आध्यात्मिकता यांच्या जंजाळांत न पडण्यावरच विसंबतो.

रामायण–महाभारत इत्यादी ग्रंथावर संस्कार आणिं भाष्यें करणारें यानीं जी पुरुषोत्तमवादी व आदर्शवादी दृष्टी ठेवली आहे तिची अंधश्रद्धामय झांपड दूर करणें हेही इतिहासकाराचा मार्ग शोधण्याचें आणखी एक आवश्यक साधन होय. व्यक्तित्व हें सद्‌गुण आणि दुर्गुण यांच्या संयोगानेंच घडतें. या वस्तुस्थितीकडे डोळेझांक करून निर्मिलेले आदर्श हे आदर्श असतात ही भ्रामक समजूत आहे. रामायण-महाभारताचे आपणावर संस्कार केले जातात, तेव्हां रामास आपल्या पित्याची म्हातारपणांतील कामुकता धिक्कारणीय वाटली; रामानें राजकीय हेतूसाठीं वालीचा अधार्मिक वध केला; सीतामुक्तीनंतर रामाचें मन पुरुषसुलभ अशा क्षुद्र संशयानें ग्रस्त झालें; तेव्हां सीतेनें त्याला झाडलें, कृष्ण अभिमन्यूचें रक्षण करूं शकला नाहीं; दुर्योधनानें मरतांना कृष्णाची धिंड काढली, तेव्हां कृष्णानें शरमेनें मान खालीं घातली; अश्वत्थाम्याची शेवटची निर्भ्रूणता ही कृष्णाच्या दूरदृष्टीच्या कक्षेबाहेरची ठरली; अशा असंख्य गोष्टी कटाक्षानें रंगसफेती-खालीं दडविल्या जातात. यामुळें रामकृष्णांच्या आदर्शत्वाचा अतिरेक होऊन ते देव म्हणून देव्हाऱ्यांत जाऊन बसतात. त्यांचें देवत्व दगडांत ओतून त्यांना गाभाऱ्यांत बसविल्यावर आपण माणूस म्हणून वाटेल तसें वागण्यास मोकळे होतों. 'तो देव–त्याचें त्याच्याकडे; आपण माणूस आपला याशीं संबंध काय? अशी प्रतिक्रिया होते. देवास नमस्कार केल्यानें वाटेल त्या पापांतून आणि वाटेल त्या संकटांतून मुक्तता होते असा भ्रम होऊन जर चारित्र्यशुद्धता आणि पराक्रमशीलता याच्याच मुळावर घाव बसला तर या आदर्शांतील आदर्शता राहिली कुठें. ज्यांच्या आचारास विचाराचें मूळ आहे त्यांचीच चारित्र्यशुद्धता टिकली आहे पण ज्यांच्या आचारास अंधश्रद्धेचाच आधार आहे असे लोक एकीकडे विश्वशांतीसाठीं आध्यात्मिकतेचा डामडौल मिरवत असतांना दुसरीकडे संधी मिळतांच ती साधून खुशाल जगाचे गळे कापत आहेत. अन्नधान्याचा भाव वाढवून लाख लोकांना उपाशीं मारणारा माणूस लाख रुपये खर्चून रामाचें मंदिर बांधतो आणि शांतपणें मरतो. आपलें कांहीं चुकलें हेंही त्याला समजत नाहीं. रामकृष्णांचे आदर्श हाताळण्यांत आपल्या द्रष्टयांची जी चूक झाली त्याचाच हा परिपाक आहे. अविचारानें आध्यात्मिकता हाताळली तर तिचेही परिणाम विपरीतच व्हावयाचे. रामकृष्णाचें देवत्व झाडून टाकणें ही आजची राष्ट्रीय गरज आहे. या व्यक्ति रक्तमांसाच्या घडल्या असून; सुष्ट आणि दुष्ट अशा प्रवृत्तींच्या बनल्या असून, या प्रवृत्तीचा संयोग त्यांनीं व्यवहारांत यश मिळविण्यासाठीं कसा केला, याचा अभ्यास झाला तरच त्यांचीं चरित्रें आदर्श ठरून, जीवनांतील खांचखळगे टाळणारे मार्गदर्शक बनून यशाचीं साधनें होतील. आपण आपल्या राष्ट्रीय धनाच्या अभ्यासांत या गोष्टीकडे साफच दुर्लक्ष केलें आहे.

समाजशिक्षणाची जबाबदारी ज्यांच्यावर होती त्यांनीं ही गोष्ट स्वार्थासाठीं केली. सुष्टांचे देव घडवून त्यांना यांनीं उपजीविकेचें साधन म्हणून राबविलें. तसेच त्यांना जे दुष्ट वाटले त्यांना पददलित राखण्याचीही पराकाष्ठा आपल्या मिराशीवर गदा येऊ नये या स्वार्थी हेतूनेंच करण्यांत आली. रामायणाचा इतका अभ्यास झाला पण रावणाचा जाहीर गौरव करणें कोणास स्मरलें काय? परम सुंदर अशी तरुण सीता त्याच्या बंदीत दीर्घकाल असतां त्यानें तिचा बळानें उपभोग घेतला नाहीं यांत कांहींच सुसंस्कृती नाहीं काय? आपल्या पूर्वजांच्या आणि देवतांच्या लैंगिक दुष्कर्मांनीं आपलीं पुराणें बरबटलीं आहेत. त्याच्या पार्श्वभूमीवर रावणाचा सुसंस्कृत सदाचार उठून दिसत नाहीं काय? रावणास नांवें ठेवणाऱ्या घमेंडानंदनांतील कितीजणास एवढा मनःसंयम शक्य आहे? महाभारताचा अभ्यास करणाऱ्या कितीजणांनी, मनुष्याचें मोठेपण जन्मावर नसतें तर कर्मावर असतें हे दुर्योधनाचे आणि कर्णाचे चिरंजीव उद्‌गार समाजांत रुजवून समाजाचें कल्याण करण्याचे कष्ट घेतले आहेत? किती जणांनीं याचा उद्‌घोष केला आहे? फक्त इतकीच गोष्ट शिकविण्याचें कार्य जरी या समाजशिक्षकांनीं केलें असतें तरी आज आपणासमोरचे शेकडों सामाजिक प्रश्न शिल्लक उरले नसते. आजचेही बहुसंख्य समाजशिक्षक हे पूर्वकालीन समाजशिक्षकांचे वंशज असावें असें वाटतें. आपल्या पूर्वजांची चूक स्पष्ट शब्दांत कबूल करणें त्याच्यानें होत नाहीं; तर त्याकाळीं केलेल्या गोष्टी या तत्कालीन समाजाची गरज म्हणून केल्या गेल्या असें ते म्हणतात. कर्णाच्या जन्माशीं सूत या जातीशीं पडलेली गांठ महाभारतामधील अनर्थ घडविण्यांत जो भीषण भाग घेते तो पाहिला की जातिभेद ही त्या काळच्या समाजाची गरज होती असल्या गोष्टीवर दुधखुळा माणूसच भरंवसा ठेवील. पण हें सारें पहावयास सरळ विचार करण्याचें सामर्थ्य हवें. रावणाची सुसंस्कृती ही जे शापभयाच्या माथीं मारतात आणि कर्णावर कांहीं अन्याय घडला हेंच ज्यांना पटत नाहीं त्यास

हा विचार सुचावा कसा ? त्यांनीं निदान सामाजिक गरजेखालीं आपला अन्याय लपवूं नये. या साऱ्या गोष्टी स्वार्थानेंच झाल्या हें सरळ कबूल करावें.

त्यामुळें आपण या आदर्शापासून जें शिकावें तें मुळींच शिकलों नाहीं ? रामायणाचा आदर्श कोणता ? आपल्या उणेपणामुळें अथवा आपण संरक्षण करूं न शकल्यानें सीतेला चोरून नेण्यांत आल्यावर तिच्या नांवानें स्नान करून तिचा त्याग करावा हा रामायणाचा आदर्श कीं आपल्या असमर्थपणामुळें जी परक्या हातीं गवसली ती पवित्र हें जाणून तिला लावलेला चांडाळाचा हात उखडण्यासाठीं सागरावर सेतू बांधणें हा रामायणाचा आदर्श ? फाळणीच्या वेळीं आपल्या ज्या सीता आपल्या उण्या पौरुषामुळें पराधीन झाल्या व रावणांकडून विटंबित झाल्या त्यांच्या विमोचनासाठीं आम्ही पौरुषाचे किती सेतू बांधले ? उलट नाना यातना सोसून ज्या आपणाकडे आल्या त्यांचा आम्हीं त्याग केला. हा का रामायणाचा आदर्श ? रामाने अहिल्या उद्धारिली, सीता स्वीकारली हें आम्ही विसरलों आणि कोणा पै मोलाच्या पुराणिकानें प्रक्षिप्त उत्तरकांड रचून जो सीतात्याग रचिला तो आम्ही स्मरत बसलों. यानें आमच्या स्त्रियांची जी अवनती आणि विटंबना झाली ती आपल्या समाजांत प्रतिबिंबित कां होणार नाहीं बरें ?

आम्ही पत्नीच्या पवित्र्यावर जोर दिला. पतींच्या पौरुषावर दिला नाहीं. उच्च वर्णियांच्या जन्माचे दिवे ओवाळाले. पण तथाकथित हीन वर्णियांच्या कर्माचे ओवाळले नाहींत. पुरुषी आणि ब्राह्मणी अशा आपल्या समाजांतील धुरिणांनीं स्त्रिया आणि अब्राह्मण यांना चेंचण्यासाठींच रामायण आणि महाभारत यांना राबविलें आहे. भीमाचा संताप अनैसर्गिक कोंडमाऱ्यांत सापडल्यावर त्याची विकृत परिणती दुःशासनाचें रक्त पिण्यांत झाली. तसाच परिणाम आपल्या दुष्कर्मांचा झाला आहे. अनैसर्गिक दडपणाखालीं दबलेल्या स्त्रियांनीं आणि अब्राह्मणांनीं जी प्रतिक्रियेची उसळी घेतली आहे ती समाजविनाशक असें विकृत टोंक गाठणार नाहीं असा भरंवसा देतां येणार नाहीं. स्त्री या विषयाबद्दल रामाची जी दृष्टी ती आपणास पचली नाहीं; महाभारतांतील कर्ण चरित्रापासून आपण शिकावें तें शिकलों नाहीं; त्याचप्रमाणें स्त्री या विषयाबद्दल भारतांत कृष्णाची जी दृष्टि निर्विवादपणें दिसते तीही आम्ही पचवूं शकलों नाहीं. कृष्ण नरकासुराचा वध करून स्त्रीदास्यविमोचन करतो; रुक्मिणीचा अपमान होऊं घालतांच शिशुपालाचा वध करतो; द्रौपदीच्या मानासाठीं महाभारत घडवितो यावरून आपण काय शिकलों आहोंत? आपले हरिदास पुराणिकादी समाजशिक्षक कृष्णाच्या रासक्रीडेचीं जीं थोतांडें मिटक्या मारीत गातात ते कृष्णाचा हा स्त्रियांविषयींचा इतिहाससिद्ध दृष्टिकोन समाजाला पटविण्यासाठीं कोणते कष्ट घेतात ? मोहोरलेल्या आम्रवृक्षाचें स्वारस्य ज्याप्रमाणें वायसाला कळत नाहीं त्याचप्रमाणें आपणांसही या ग्रंथाचें स्वारस्य कळलेलें नाहीं. कावळा आम्रमंजिरी न पहातां फाटक्या पहातो. बेडूक कमल मकरंद न पहातां चिखलांत नाक खुपसतो त्याप्रमाणें आपण आपल्या चिंतनाचा भर कृष्णाकडून युधिष्ठिराकडे आणि जगद्विजयी कर्तृत्वाकडून अपेशी तत्वज्ञानाकडे वळविला आहे. आणि या विकृत अभ्यासाचीं फळें आपल्या धार्मिक, सामाजिक आणि राजकीय जीवनांत पदोपदीं प्रकट होत आहेत.

यांतील सर्वांत विपरित फळ म्हणजे आपल्या राजकीय तत्वज्ञानांत भेसळ करून अनैसर्गिकपणें शिरलेलें आध्यात्मिक तत्वज्ञान होय. युधिष्ठिराच्या व्यावहारिक जीवनाची माती झाली ती त्यानें राजकारण आणि तत्वज्ञान यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला यामुळेंच झाली. या विषाचें बीज युधिष्ठिरानेंच पेरलें हें खास. युधिष्ठिरापूर्वींचा मोठा राष्ट्रीय आदर्श जो राम तो सत्य–अहिंसेचें भलतें थोतांड माजविणारा असता तर त्यानें वालीवध केलाच नसता. राम हा राजकीय पौरुषाचें उत्तुंग प्रतीक होय. महाभारतांतही राम आपल्या कृष्ण या पुढील अवतारांत दिसतो. पण आपण आपलें लक्ष त्याच्यावरून उचलून युधिष्ठिर या कलिपुरुषाकडे वळविणें अधिक शहाणपणाचें मानतो. युधिष्ठिर हा क्षत्रिय होता. त्यानें एकतर राजवैभव भोगावयाचें होतें अथवा तत्त्वचिंतनाचा एवढा हव्यास होता तर राज्यावर पाणी सोडून वनांत जावयाचें. द्रौपदी आणि राज्य याचा मोह त्याला सुटता तर कदाचित् तो भारतांतील पहिल्या श्रेणीचा ऋषी होता. संयमाची महती तर गावयाची आहे आणि कांतेचा मोह तर सुटत नाहीं अशा ओढाताणींत त्यानें तत्त्वज्ञानाच्या बैठकीवर राजकारण आणण्याचा प्रयत्न केला आणि दोन नायकांच्या दादल्याप्रमाणें आयुष्याचा बोजवारा उडविला. समर्थ आणि निर्णयक्षम पुरुष यांतूनही मार्ग काढता. पण युधिष्ठिरास या गुणांचें वावडें होतें. आत्मिक उन्नती हें तत्त्वज्ञानाचें फल. ऐहिक उन्नती हें राजकारणाचें फल. आत्मिक उन्नतीसाठीं आदर्शांची आस धरून जगांतून उठावें आणि वनांत जावें हा उत्तम मार्ग. ज्यांना राजव्यवहाराची आस आहे त्यानें अमर्षशील आणि प्रयत्नशील राहून उन्नती साधावयास हवी. निस्पृहतेमुळें कनक आणि कांता यावर लाथ मारून ज्या कालांत आणि पारिस्थितींत भीष्म महत्पदास चढला त्याच कालांत आणि परिस्थितींत स्वार्थ आणि परमार्थ साधावयाच्या लटपटींत सांपडून युधिष्ठिर वांया गेला. जीवनाचा जो मार्ग त्यानें पत्करला त्यावर या सुष्ट आणि दुष्ट प्रवृत्तींचा उचित ठिकाणीं संयोग करणें त्याला जमलें नाहीं. युधिष्ठिरानें राजकारणच करावयाचें होतें याचा अर्थ त्यानें तरवार उपसून रोज युद्ध करावयास हवें होतें असा अभिप्रेत नाहीं. व्यक्तित्व हें सुष्ट आणि दुष्ट अशा प्रेरणांच्या उचित संयोगानें घडतें हें पूर्वोक्त आहे. द्रौपदी स्वयंवराच्यावेळीं मलाही बायको हवी असें जाहीर करून युधिष्ठिरानें एकदां स्वार्थाचा मार्ग चोखाळला होता. तोच शेवटपर्यंत धरून त्यानें त्यांत यशस्वी व्हावयास पाहिजे होतें. पारलौकिक जीवनांत यशस्वी होण्याची त्याची मर्यादा तेव्हांच संपली होती, हें जाणून त्यानें पुढील जीवनांत पारमार्थिक विचारांना त्या मर्यादेंतच राखावयास हवें होतें. पण त्यानें दोन्ही गोष्टींना मर्यादेपलीकडे जाऊं देऊन अमर्याद अपयश मिळविलें दोन्ही डगरींवर हात ठेवून लोंबणारा मनुष्य शेवटीं खड्ड्यांत पडतो असें म्हणतात त्यांत खासच अर्थ आहे. 'स्वे स्वे कर्मणि अभिरतः नरः संसिद्धिं लभते' ॥ हाती घेतलेलें एकच काम नेटानें पुरें करणारा मनुष्य मुक्ति पावतो. असें कृष्णानें म्हटलें आहे. त्यानें घोडे हांकण्याचें कामसुद्धां अशा पूर्णतेनें केलें कीं त्या क्षुल्लक गोष्टींत त्याला लाभलेलें यश युधिष्ठिराला सर्व जीवनांतही लाभलें नाहीं त्याला कारण हेंच होय. जीवन अयशस्वी होण्यास लागणारे दुसरें दुर्गुण युधिष्ठिराकडे नव्हते असें नाहीं. तो स्वार्थी होता. अहंमन्य होता. आत्मसंतुष्ट होता. व्यवहारशून्य होता. त्याला विवेचक दृष्टी नव्हती. मिळेल त्या ठिकाणी त्यानें ज्ञान जमविलें होतें पण त्यांतलें एकही पचविलें नव्हते. वेड्या मनुष्याच्या गांठोड्यांतील

बेताल वस्तुसंग्रहाप्रमाणें त्याचा ज्ञानसंग्रह होता. त्यांत सारासार विचार नव्हता. त्याची निर्णयशक्ति शून्य होती. त्याला पौरुषाचें वांकडें होतें. व्यक्तिधर्म आणि राजधर्म याचा मेळ त्याला कळत नव्हता. एक ना दोन. यांतील एकच दोष मनुष्याच्या नाशास पुरेसा आहे आणि या साऱ्यांच्या भरीला त्यानें केलेला राजकारण आणि तत्त्वज्ञान यांचा भोंगळ गोंधळ आल्यावर आणखीं काय हवें ?

दुर्दैवाची गोष्ट अशी कीं युधिष्ठिरानें ठेवलेला हा घातक वारसा निकारानें त्याज्य ठरविण्या ऐवजीं आपण तो आपल्या रक्तांत भिनवून घेतला आहे. अशोकाचें तत्त्वज्ञान कितीही उदात्त असलें तरी त्याचें राजकारण सर्वथा अपेशी ठरलें. युधिष्ठिराचा औरस पुत्र शोभावा असें अशोकाचें चरित्र. कौटिल्याच्या राजकारणाच्या बळावर चंद्रगुप्तानें संपादिलेलें आणि दृढमूल केलेलें विशाल साम्राज्य अशोकानें उधळून लावलें. तत्वज्ञानाच्या व्यासपीठावर अशोकाचें स्थान कितीहि उंच असलें तरी राजकारणाच्या व्यासपीठावर या विधुळवाण्या पुरुषास जागा नसावी. पण आज आपण राजकीय तत्त्वज्ञान म्हणून अशोकाची तळी उचलून धरली आहे. आपल्या सर्व राष्ट्रीय पौरुषशून्यतेचें एकमेव गमक हेंच आहे. आपण युधिष्ठिराच्या नादानतेची पराकोटीची पातळी अजून गांठलेली नाहीं अशीं लक्षणें सुदैवानें मधून मधून दिसतात खरीं. पण आपण ती पातळी गाठणारच नाहीं आणि आपलें राष्ट्रीय भवितव्य उज्ज्वल पौरुषानें तळपणार आहे असा पुरा विश्वास हीं लक्षणें उत्पन्न करीत नाहींत हेही खरें. युधिष्ठिराचें अथवा अशोकाचे भूत खांद्यावर बसल्याप्रमाणें आपण मधेंच गोंधळून जातों, आणि 'पंचशील', 'भाईभाई' असें काहींतरी बरळूं लागतो. या भुताचा पगडाही जबरदस्त असतो. तुकाराम महाराज हे विठ्ठलाच्या एवढे नादीं लागले होते कीं प्रातर्विधी चालू असताही ते विठ्ठल विठ्ठल म्हणत. त्याच्यासारख्या परित्यागी संताला हें शोभून दिसतें. पण आपण राजकारण करावयास निघालों असतां जेव्हां आपल्या खांद्यावर बसलेलें भूत आपणांतील कोणाच्याही तोंडून आणि कोणत्याही प्रसंगी 'पंचशील पंचशील' असा घोष करवितें तेव्हां आपलें पुढें काय होणार असा घोटाळा वाटूं लागतो. मांत्रिकानें चोप द्यावा त्याप्रमाणें आपल्या पंचशीलानें पंचा सोडून शील उघडें केलें मग आपण चपराक बसल्याप्रमाणें चूप बसतो. भाईभाईनी आपला गळा कापला की आपली काहींबाहींच अवस्था होते. आपल्या पंधरा वर्षाच्या त्रोटक राजकीय इतिहासांत आपण पंचशील, भाईभाई, वनमहोत्सव अशा प्रकारची निरर्थक, भोंगळ आणि दिशाभूलकारक थेरें आणि वेडेचार करून दाखविले आहेत कीं तेवढें प्रगत राष्ट्रांच्या सबंध इतिहासांत मिळणें कठीण. यांतील प्रत्येक थेराच्या वेळीं आपण तोंड पोळून आणि थोबाड फोडून घेतलें आहे हा तर आपला विशेष आपल्या युधिष्ठिरीय परंपरेस शोभेसा आहे. स्वतःच्या पोरास उपाशीं ठेवून बालसंगोपनाचें व्याख्यान देणाऱ्या मूर्ख मातेप्रमाणें आपण आपलें घर सांभाळून होण्याअगोदरच जगाचें राजकारण सांभाळूं पहात आहोंत. नातवानें आजोबास उपदेश करावा तसें आपण आपलें राजकीय तत्वज्ञान यशस्वी करून दाखविण्याच्या अगोदरच जगांतील मुरलेल्या राजकारणी पुरुषांना अनाहूत सल्ला देऊन तोंडघशीं पडत आहोंत.

आपला पिंडच तत्त्वज्ञानी घडलेला असल्यानें कोणीं कसलेंही तत्त्वज्ञान त्याच्या स्वार्थासाठीं पुढें मांडलें कीं आपण त्यांत लगेच गुरफटतों. आपली अस्मिता जिवंत राखून त्या तत्त्वज्ञानाची चिकित्सा करणें आपणास सुधारत नाहीं. सुरांच्या जाळ्यांत गुंतून आपली मान फासांत देणाऱ्या हरिणाप्रमाणें तत्त्वज्ञानाचें आमीष दिसतांच आपली गती होते. आज आपली अस्मिता मानवतेपुढें बळी देण्याच्या तत्वज्ञानाचें नवें खूळ समोर येत आहे. उद्यां आणखी कसलें खूळ येईल त्याचा नेम नाहीं. जणूं आपला पुरेसा विनाश अजून झालेला नाहीं. मानवता मानवता म्हणजे तरी काय आहे ? साऱ्या अस्मितांतील मांगल्याच्या समन्वयानेंच मानवता बनत असतें. या अस्मितांची प्रतिष्ठा समतोल सांभाळून राहिली तर मानवतेचा गौरव होणार असतो. साऱ्या अवयवांचें स्वास्थ्य समतोल असणें हीच देहाची निरामयता होय. एकाद्या अवयवाचें स्वास्थ देहासाठीं विलीन पावणें यांत शेवटीं देहालाच उणेपणा येणार असतो. सारी मानवजात एकसंध नाहीं आणि होणार नाहीं. निसर्गाच्या शक्तीमुळें आणि बंधनामुळें तिचे विभाग हे रहाणारच. या साऱ्या विभागांची मानवजात आणि त्याच्या अस्मितांची मानवता होणार आहे. व्यक्तीचें आणि समाजाचें जें नातें आहे तेच अस्मिता आणि मानवता यांचें आहे. व्यक्तीची पत्नी आणि घर हें कोणत्याही समाजांत जर त्या व्यक्तीचेंच असेल तरच त्या समाजाची स्थिरता टिकते. पण ही पत्नी आणि घर जर साऱ्या समाजाचें झाले आणि साऱ्या व्यक्ति या पातळीला आल्या तर समाजच टिकणें अशक्य होईल. राष्ट्रीय अस्मितेचें असेंच आहे. ती मानवतेंत विलीन झाल्यानें मानवतेचें भलें होईल असें मानणें हा अव्यवहारी आदर्शवादाचा अतिरेक आहे.

तत्त्वज्ञानाच्या अतिरिक्त आसक्तीमुळेंच आपल्या समोरचे अनेक प्रश्न उपस्थित होत








आहेत. एकांगी अतिरेकापुढें आपणांस समन्वयाचें अवधान रहात नाहीं. राग–प्रेम, हिंसा–अहिंसा इत्यादी परस्परविरोधी द्वंद्वांनीं जीवन घडत असतें. त्यांचा समन्वय उचित वेळीं करण्याचें जेवढें कौशल्य आपणाकडे असेल तेवढें आपण जीवनांत यशस्वी होतो. तत्त्वज्ञानाची बैठक यांतील एकाच गोष्टीच्या अतिरेकावर आधारली असल्यानें त्याच्या आहारीं गेल्यावर आपला समन्वयाचा समतोल सुटतो आणि त्याची परिणती शेवटीं आत्मनाशांत होते.

दुसऱ्यास लाथ मारूं नये हा उपदेश अर्थशून्य आहे. अकारण दुसऱ्यास लाथ मारूं नये असा तो हवा. त्यांतही ज्यांस लाथ मारण्याचें सामर्थ्यच नाहीं अशास हा उपदेश हवा तरी कशाला ? अर्थात लाथ मारूं नये या उपदेशाअगोदर लाथ मारण्याचें सामर्थ्य संपादन करावें असा उपदेश हवा. एवढ्यावरच ही गोष्ट भागणार नाहीं. दुसऱ्याची लाथ अकारण खाऊं नये याचीही जाणीव नको काय ? आणि अगोदर अशी अकारण लाथ खाऊन मग तिचा प्रतिकार करण्याचा द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षां, आपणास अकारण लाथ मारावयाचा विचार कोणास शिवणारही नाहीं असें आपलें सामर्थ्य असणें हाच आदर्श विचार नव्हे काय ? आपलें दुर्दैव असें कीं आपण केवळ दुसऱ्यास लाथ मारूं नये असें एकांगी व अतिरेकी तत्त्वज्ञान उरीं धरण्याच्या प्रयत्नांत आहोंत. हें तत्त्वज्ञान आत्मघातकी आहे. विश्वाचा सुद्धां तोल सांभाळला गेला आहे तो सारे ग्रहगोलक आपल्या शक्तीनें दुसऱ्यांस त्यांच्या मर्यादेंत ठेवण्यास समर्थ आहेत म्हणूनच. ज्या क्षणीं ही शक्ति कमी होऊन ती मर्यादा सुटेल तोच क्षण कल्पांताचा क्षण नव्हे का ?

भेकड तत्त्वज्ञानाचा आसरा घेतल्यानें हिंसा आणि संकर टळेल ही कल्पना भ्रामक आहे हें महाभारतानेंच सिद्ध केलें आहे. युद्धिष्ठिर अतिरेकी न होता व आपल्या शांती–अहिंसेशीं, भीमाच्या संताप व हिंसेचा योग्य समन्वय वेळींच होऊं देता तर दुर्योधनास द्रौपदीच्या निरीस हात घालविण्याआधीं वेळींच जरब बसती, आणि पुढचा सारा संकर टळता; हिंसा टळती; कुलक्षय टळता. युधिष्ठिराची अतिरेकी व तत्त्वज्ञानी अशी शांतीलालसाच त्याच्या राजकारणाची •मासी करण्यास कारण झाली. मानखंडना, विटंबना, अपमान, अपेष्टा, कुलक्षय हें सारें कांहीं होऊन शेवटीं संकर आणि हिंसा व्हावयाची ती झालीच. 'सर्व विनाश झाल्यावर हें राज्य काय डोंम्रलावर घालण्यासाठीं मिळविलेस' असा प्रश्न त्याला द्रौपदीनें उगाच विचारलेला नाहीं. वेडगळ आणि अनैसर्गिक ब्रह्मचर्याच्या नादीं लागून एकाग्रानें आपलें तारुण्य नाश करावें आणि गलितगात्र झाल्यावर गाढवांच्या कामकला पहाण्यांत रस घेऊन गाढव गेलें आणि ब्रह्मचर्य गेलें अशा दशेप्रत यावें यांत शहाणपणा आहे ? ईश्वराची सृष्टी ही अशा अतिरेकी नादानांसाठीं नाहीं. सृष्टींतील भल्याबुऱ्याचें अस्तित्व जाणून जीवनांत भल्याबुऱ्याचा संयोग जो साधील तोच यशस्वी होईल. सृष्टींतील सारी हिंसा आणि संकर टाळणें शक्य होईल हें तत्त्वज्ञानाची अफू पिणाऱ्याचें स्वप्न आहे. असें लोकच आपल्या भेकडपणामुळें दुर्योधन, हिटलर असले राक्षस माजण्याचें मूळ कारण होतात, त्यामुळें अशा राक्षसांच्या पापांचे धनी हे भेकड लोक होत. अहिंसक युधिष्ठिर हा महाभारतांतील साऱ्या हिंसेचा जबाबदार आहे. पतिव्रता पत्नीच्या अपमानाची पत्राज न बाळगणारा तो पामरच पुढच्या साऱ्या संकराच्या पापाचा मालक आहे. अपत्यानें जीवनाचा पहिला श्वास घ्यावयास हवा असेल तर नाळ सारी राखून चालत नाहीं, मुळापासून तोडून चालत नाहीं. तर चार बोटें राखून तोडावी लागते. या चार बोटाचें अंतर कळणें हेंच यशस्वी सुईणीचें लक्षण होय. राष्ट्राचें बाळंतपण करावयाचा पत्कर घेतात त्यांनीही हें अंतर नीट जाणावयास हवें. युधिष्ठिरानें हें अंतर जाणलें नाहीं आणि आपला व आपल्या पाल्यांचा सर्वनाश करून घेतला. आपण तरी त्याच्यापासून धडा घेऊन हें अंतर जाणण्याच्या प्रयत्नांत आहोंत काय ?

शंका आहे. आपण युधिष्ठिराप्रमाणें सालाझारकडे गोव्याच्या पांच गांवाची भिक्षा मागत किती वर्षें काढली ? सुईच्या अग्रावर राहील एवढीही जमीन तुम्हांला मिळणार नाहीं हें त्याचें उत्तर का आपणांस अनपेक्षित होतें ? आपल्या या याचक तत्त्वज्ञानावर तरी आपला पुरेसा विश्वास होता काय ? शेवटीं युधिष्ठिराप्रमाणें आपण शस्त्रही उचललेंच. मग हिरवे गुरुजींसारख्यांचें प्राणदान आणि सुधाताईसारख्यांचा बंदिवास आपण नाहक आमंत्रिला नाहीं काय ? ज्या जागतिक भलाईसाठीं आपण हें केलें ती भलाई आपणास मिळाली काय तत्त्वज्ञान आणि धर्म असल्या गोष्टी दुसऱ्यास उपदेशिण्यासाठीं असतात. तशाच आपण पाळण्यासाठीं असतात. आपला विनोद असा आहे की दुसरे फक्त आपणास उपदेश करीत असतात आणि आपण तो फक्त पाळत असतों. द्रौपदी दासी झाली कीं नाहीं असला प्रश्न सभेंत चर्चेला येऊं देऊन युधिष्ठिरानें जसा त्याचा बोजवारा केला तसाच काश्मीरचा नसलेला प्रश्न आपण चर्चेस मांडून त्याचा बोजावारा केला आहे. द्रौपदीच्या अब्रूवर जयद्रथानें हात टांकलां; तेव्हां युधिष्ठिरास भीमाच्या संतापाचेंच आश्चर्य वाटलें. आजही द्रौपदीवर कोणी बलात्कार करतो तेव्हां कोणी संतापला तर आपणास नवल वाटतें. बलात्कार ही तारुण्यसुलभ घटना आहे त्यांत रागवावयाचें कारण काय हेंच आपणास कळत नाहीं. फाळणीच्या वेळीं झालेली अमाप हिंसा आणि अमाप संकर हें वेडगळ तत्त्वज्ञानावरील आपल्या आंधळ्या दृष्टी श्रद्धेचें फळ होय हें आपणास उमगत नाहीं. स्वातंत्र्य मिळालें तें लढ्यामुळें मिळालें असे आपण म्हणत नव्हतोंच. अहिंसक लढ्यामुळें मिळालें असेंही म्हणावयाचें आपण बंद करीत आहोंत आणि अहिंसेमुळें मिळालें असें म्हणूं लागलों आहोंत ही दिशाभूल नव्हे काय ? भारताचा जुना इतिहास विपर्यस्त स्वरूपांत पाहून आपण आपल्या पायांवर धोंडा पाडून घेतला होता. आजचा इतिहासही आपण विपर्यस्त करणार काय ? जीवनांत उभ्या रहाणाऱ्या लक्षावधी प्रश्नांपैकीं क्वचित एखादा तत्त्वज्ञानाच्या अतिरेकी भूमिकेवरून सुटत असेल. पण त्याचा डांगोरा पिटून इतर प्रश्नांतील अपयशाकडे डोळेझांक करणें यात शहाणपणा नाहीं. अशा अपवादांनी अपवाद हा नियम बनत नाहीं. तर मूळचा नियम सिद्ध होतो हें ध्यानांत धरावयास हवें. पण युधिष्ठिर आपल्या रक्तामध्यें पार भिनून गेला आहे आणि जीवनाच्या प्रत्येक कक्षेंत प्रगट होत आहे. त्यापुढें आपणास हा विवेक रहात नाहीं.

युधिष्ठिराचें भविष्यच आपल्या वांट्यास येणार आहे काय ? पुत्रपौत्रांची राखरांगोळी झाल्यावर का आपणास वैभव लाभणार आहे ? अंगें गलित झाल्यावरच का आपणास द्रौपदीची विचारपूस करावयास वेळ मिळणार आहे ? दांत पडून गेल्यावर का आपण चणे खाण्याचा प्रयत्न करणार आहोंत. सुमारें हजार वर्षांच्या काळांत हजार मैल भूमीवर पाणी








सोडून पुढें गमन करणें हा आपला इतिहास आजवर पुन्हां पुन्हां घडत आला आहे. हा असाच का घडत रहाणार आहे ? आपली शेवटची गती का हिंदी महासागर ठरणार आहे ?

युधिष्ठिराच्या दानावर जगणारे भिक्षुक त्याचा उदोउदो करून त्याच्या उज्ज्वल पारलौकिक भविष्याचा डांगोरा पिटत. आजही आपल्या आजच्या तत्त्वज्ञानांतून पुढें मंगल प्रभात येणार आहे असें गाणारे तोंडपुजे, स्वार्थपर दानलोलुप भाट चोहोंकडे सुकाळले आहेत. यांपासून आपलें रक्षण कोण करणार आहे ? आपणास मार्ग दाखविणारा कृष्ण केव्हां जन्मास येणार आहे ?

तत्त्वज्ञानानें आंधळे झालेल्या आपणास आपल्या दुर्दैवाची जाणीवही होत नाहीं. कुंतीच्या मुखांत आम्हीं घातलेल्या 'हे भगवंता, मला चिरंतन दुःखी ठेव म्हणजे त्यामुळें तुझें स्मरण होईल' या प्रार्थनेमध्यें अवनतीचीं सारीं बीजें सांचविलीं आहेत याची आपणास जाणीव नाहीं. दुःखाची परंपरा कोसळण्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना करण्याचे कष्ट कशाला ? या फसव्या तत्त्वज्ञानाची मोहिनी आपणावरून उठणार तरी कधीं ? संकटें ही परमेश्वराची कृपा असें मानणाऱ्या आपली उन्नती होणार तरी कशी ? अवनतीची जाणीवच नसेल तेथें उन्नतीचा मार्ग शोधणार कोण ? आप्तजनांचा मृत्यु झाला म्हणजे 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम्' अथवा 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' हें ऐकायला ठीक वाटतें. पण मरण ही प्रकृती असली तरी तीच जर प्रवृत्ती झाली तर विश्वाचा संसार चालावयाचा कसा ? आपली प्रवृत्ती मरण टाळण्याकडे असली तरच आपण जन्म घेऊन फायदा. आपल्या सर्व तत्त्वज्ञानाची गतच अशी अतिरेकी आहे. शांती सुखद असली तरी स्मशानशांती सुखद नाहीं. लढाई नंतर काव्यास अर्थ असतो; श्रमानंतर विश्राम रुचतो; तसेंच शांतीचे आहे. लाथेनें ठोकरलें जाऊन निपचित पडल्यावरची शांती काय कामाची ? आपल्या बळाच्या आदरानें लोक आपणापुढें पाळतील तीच शांती आपणास रुचेल. विश्वप्रेमाचें तत्त्वज्ञान सोज्वळ दिसलें तरी फसवें आहे. बळी तो कान पिळी हा निसर्गाचा नियम आहे. मानवानें निसर्गावर विजय मिळविला तरी तो मर्यादितच असावयाचा. वत्सल पिता आपल्या तान्हुल्यास आपल्या मिशा ओढूं देतो तसें आपल्या निसर्गावरील विजयाचें स्वरूप आहे. निसर्गनिरपेक्ष जीवन जगणें ही गोष्ट केवळ असंभव आहे. निसर्गाची घडण जोवर द्वंद्वांनीं घडली आहे तोवर मानवी स्वभावांत द्वंद्वें असावयाचींच आणि विश्वप्रेमाला मर्यादा पडावयाच्याच. मोठा मासा लहान माशाला विश्वप्रेमाचा आवर्जून उपदेश करूं लागला तर माशानें सावध रहावयास हवें. सुवर्णाच्या आसनावर बसलेला माणूस जेव्हां दुसऱ्यास त्याच्या जवळील पैचा त्याग करण्याचें तात्त्विक आध्यात्म शिकवितो तेव्हां एकुलती एक पै हेंच ज्याचें धन त्यानेंच सावध रहावयास हवें.

तत्त्वज्ञानाचें, आध्यात्माचें, अद्भुताचें, ईश्वरी सामर्थ्याचें माझें मुळींच वांकडे नाहीं. या गोष्टी जें काय असतील ते भले असोत. जे अशा सामर्थ्यांनीं संपन्न असतील ते भले असोत. पण या गोष्टी सामान्य माणसाच्या राष्ट्रीय आणि सामाजिक पौरुषास विघातक होता कामा नयेत. ज्या एका ऐतिहासिक परंपरेनें आपण उत्तर ध्रुवापासून उत्तर प्रदेशापर्यंत पलायन करत करत दक्षिण दिशेकडे—कीं जी यमाची दिशा आहे—आलों आहोंत ती परंपरा जर या तत्त्वज्ञानानें टाळतां येत नसेल तर तें तत्त्वज्ञान राष्ट्राला कुचकामी आहे. फाळणीच्या वेळीं जी हिंसा आणि संकर यांची हिडिस चेष्टा आपलें काळीज थरकवून गेली, ती पहाण्याचा द्रष्टेपणा जर या तत्त्वज्ञानांत नसेल, ती टाळण्याचें सामर्थ्य जर त्या तत्त्वज्ञानात नसेल, ती थोपविण्याची प्रेरणा जर या तत्त्वज्ञानांत नसेल तर भले तें तत्त्वज्ञान शंभर हिमलयांएवढें उंच असलें तरी कवडी मोलाचें होय ? तें शुद्धांतून बाजारांत खोल बुडविणें बरें. भौतिक दृष्टीचे लोक या तत्त्वज्ञानाला धिक्कारतात त्यांत नवल नाहीं. या राष्ट्रीय आपत्ती आल्या तेव्हां या तत्त्वज्ञानानें काय केलें हें पटवून देणें हें त्याच्यावर ज्याची श्रद्धा आहे त्यांचें काम आहे. संकट यावें अशी ईश्वरी इच्छाच होती असें म्हणून भागावयाचें नाहीं. असेंच म्हणावयाचें तर जे त्या तत्त्वज्ञानाचा धिक्कार करतात तेही तो धिक्कार व्हावा अशी ईश्वरी इच्छा आहे म्हणूनच असें कां म्हणूं नये ?

आपल्या सर्वांगीण जीवनांत या तत्त्वज्ञानाचा दबदबा रहावा अशाच दृष्टीनें समाज शिक्षकांनीं रामायण–महाभारताचे संस्कार केले आहेत. हे संस्कार ज्या दृष्टीनें केले गेले ती समाज कल्याणाची नसून स्वार्थी असल्यानें आपण युधिष्ठिरीय अपेशी तत्त्वज्ञान उराशीं धरतों आणि कृष्णाचें विजिगीषु तत्त्वज्ञान अपसमजांत गुरडून आपल्या स्वार्थासाठीं राबवितों. युधिष्ठिरीय संस्कार धुडकावून लावणें आणि कृष्णीय संस्कार उचित समजुतीनें स्वीकारणें ही आजची राष्ट्रीय गरज आहे. त्यासाठीं भारतरामायणाचीं तात्पर्यें, सारांश, भाषांतरें, टीका हें सारें पुन्हां केलें पाहिजे. भारतादींच्या संस्कारांशिवाय भारतीय जीवन अशक्य आहे. त्यामुळें ते संस्कार इष्ट त्या पद्धतीनें घडविणें हीच आजची राष्ट्रीय गरज आहे.

जे समर्थ आहेत त्यांनीं हें कर्तव्य करावयासच हवें. (संपूर्ण)

(लेखन काल १९–१०–६१ ते ३०–१०–६१)

---

## मनोरे—

निद्रेच्या पानांत
मनोरे रांगत
स्वप्नांच्या शाईत
उतरले.



अंतराच्या नभ
इंद्रधनुसम
अंग मनोरम
मनाऱ्यांचें.

पहाटेला विरे
तेरड्याचा रंग
मनोऱ्यांचें अंग
जळलेलें... !

—विजय मुराणा







अनुक्रमणिका

*सगुणा जादू केल्यागत दाराकडं थांबली. आणि खडखडणारं दार तिनं उघडलं, तिनं मागं वळून पाहिलं—दिवळींत दिवा भकभकत होता. त्याच्या पिवळ्या उजेडांत विरत चाललेल्या श्रीरंगाचं हसूं तिला स्पष्ट दिसत होतं. शुद्ध हरपून ती भुईवर कोसळली.*



**संध्याकाळ** झाली होती. उन्हं सावल्या रेंगाळून रेंगाळून निघून गेल्या होत्या. रानामाळांत गेलेलीं माणसं गुरं घराकडं परतली होतीं. दिवसभर शांत ओकी बोकी दिसणारीं वाडी हलूं बोलूं लागली होती. गुरांचे हंबरणें, पांखरांचा गोंधळ, बाया–बापयांनी कुणाला घातलेल्या उंच हळ्या हे सगळे आवाज एकमेकांत मिसळून गेले होते. घरट्या घरट्यांतून चुली पेटत होत्या. धुराचे लोट आभाळांत शिरत होते. तिखटजाळ कालवण चुलीवर खदखदत होतं. बाहेर अंधार दाटत होता.

सत्यापा महार, रामजीकाका, तात्या दिवाण, मुलाण्याचा बाजी, हरिबा मुंगळे आणि गणा चलपते हीं मंडळी दाटीवाटीनं पारावर येऊन बसली होतीं. म्हातारा सत्यापा चिलमीचा दम घेत होता. बाजी मुलाणी आणि गणा चलपते विडीचा मोकळेपणानं आस्वाद घेत होते. डोळे मिटून नाकातोंडांतून धूर सोडत होते. बाकीचे तिघे चंच्या सोडून पानाची भट्टी जमवीत होते. तात्या बामण खोडीप्रमाणें पानाची शीरन् शीर काढीत होता. रामजी खुळखुळ्याच्या अडकित्त्याखालीं लंब्या वाण्याकडून आणलेली दगडी सुपारी कातरीत होता आणि हरीबा चंचीच्या शेंवटच्या कप्प्यांतला कात हुडकीत होता. चिलमीच्या तारेंतला सत्यापा महार एकाएकी बोलला—

'काय गाऽ! मंग काय हाय का न्हाई ? कां आपलं–वाळूंत मुतलं फेंस ना पानी...'

प्रत्येक शब्दावर जीभ झटकून बोलणारा मुलाणी तोंडांतली बिडी भुईवर घासत म्हणाला, 'भलेऽऽ! सत्यापानं शब्द टाकावं आन् गांवानं मोडावा अशी गोष्ट झाली कां कंदी ! आज रात्च्याला भजन होनार...'

'भजन होनार ?' हरिबाला अजून कात सांपडला नव्हता. तळव्यावरला कचरा शोधत त्यानं विचारलं, 'मुलाण्या, भजान होनार म्हणतोस ?'

गाण्याबजावण्यावर इष्काइतकी मोहोब्बत करणारा मुलाणी ठासून म्हणाला,–'होनार म्हंजे होनारच...'

'आन् पेटी–तबल्याचं काय करणार रं साडं शिटलीच्या...?'

'गुरवाकडं हैत कीं भांडीं...'

'तशा आमाकडं बी हैत...'

'म्हंजे ती मढावल्येलीं न्हाईत असाच तुजां भावार्त ना ?'

'हें ठाव असून वर बोलतुयास गाढवीच्या !–'

**पद्माकर गोवईकर**

सत्यापानं पुन्हां विचारलं, 'अगाऽऽ, पन् मंडळाला सरकारातनं मिळालेली पेटी काय झाली...?'

'अवं, ती पाटलानं खुश हून चिमा सातारकरनीला दिली...'

रामजीनं खुलासा केला.

'काय एकेक मानसं...' हरीबा पुटपुटला. तेवढ्यांत मुलाणी म्हणाला, 'अरं, मंग, डबवाडीस्न मी आनीन नान्या न्हाव्याकडं'

—तेवढ्यांत तात्या दिवाणाला मुद्याची गोष्ट आठवली. तो म्हणाला, 'आरं, पन् च्यापान्याचं काय ?'

'ह्ये वानगट गूळ आनंल...' रामजी दिवाणाला सुपारी देत म्हणाला, हरीबा मुंगळे थोडासा दचकला. आज दोन–तीन शेर गुळाला खार आहे हें तो समजला. पण भजन झालं पायजेल असं त्याचंहि म्हणणं होतं. तो चांचरत बोलला—

'व्हय्...मी...आनंन पन् बुकणीचं काय ?'

'च्याची बुकनी मी आनंन पन दुधाला कुठं जायाचं ?' दिवाण बोलला.

दुधाचा नांव काढल्याबरोबर नाकानं धूर काढणारा गणा चलपते बिडी भुईवर टाकून तटकन् उभा राहिला—

'अगा यायायाऽऽ म्येलं काम ! अरं, रानांतनं आलो तें हात-पाय धून हिकडंच आलों. धारा काढायच्या राहिल्या. बायको बोंबालनार...'

असं म्हणून तो पळत सुटला. कारण मागच्या भजनाला त्यानंच दूध दिलं होतं. मंडळींचं त्या रात्रीचं चहापाणी बघून त्याला आईचंच दूध आठवलं होतं तें पुनः आठवूं नये म्हणून तो आधीच उठून पळूं लागला. तें बघून मुंगले वाणी ओरडला—

'एऽऽ गना तूं नगं दिऊस दूध, पर रात्च्याला भजनाला येऽऽ'

'मंग ईन...' तो पळतां पळतां ओरडला.

दमछाक होईपर्यंत गणा पळत घरला आला. पायताण काढता काढता दारांतनच तो ओरडला—

'सगुनेऽ, चल आटप धारा काढ लवकर...'

सगुणा चुलीपुढं भाकऱ्या बडवीत होती, नवऱ्याची घाई ऐकून दाराशी येत ती म्हणाली, 'कां गरबड कराय लागलाय. आत्तां माळासनं जोगून आली म्हस. घटकाभर तरी जाऊं द्याल कां लगी धार काढायला बसूं...?'

अग, भजनाला जायाचंय. लई दिसातनं आज फड बसनार हाये—'












अनुक्रमणिका

'कुनी सांगितलं तुमाला ?'

'अग, आत्ता ह्ये बैठकींत ठरलं.'

'काय म्हणून ?'

'आणि काय म्हनून काय इचारतीस. भाकरी खाऊनशान भजनाला जायाचं हाये. आटप कासंडी घिऊन गोठ्यांत चल...'

खांद्यावर उतरलेला पदर डोक्यावर ठेवीत ती फणकाऱ्यानं म्हणाली, 'कासंडी घिऊन गोठ्यांत गेल्याव् काय धार देनार हाय काय तुमची म्हस ? अर्धा घंटा बसावं लागतं तिची मनधरणी करत तवा पान्यावर घालती बाय माझी.'

म्हशीवर उगाचंच तरकत गणा म्हणाला,
'अग, अशी कां कराय् लागलीया ती अलिकडं ? मिरगांत तर व्याली न्हवं ?'

'व्याली खरं, पन् कशाची धार देती म्हस ! हातभार पोट मकाळी गेलेले. काय धार देणार ? जोगवाय नगं का ती ?'

'पोट न भराय काय झालं ? दिसभर माळाला चरून येत न्हाई ? राखोळ्या घातलीयाच की !'

नवरा–बायकोचं हें बोलणं त्या मुक्या जनावराला कळलं जणूं. उगाचंच धडपडत म्हैस उठून उभी राहिली; आणि फिसकारूं लागली. आपले घारे डोळे तिनं इकडे तिकडे फिरवले. तेवढ्यांत सगुणेला कांहीं तरी जळाल्याचा वास आला. चुलीकडं धावत ती ओरडली, 'येऽ बया माजी भाकर जळाली.'

धारा काढून सगुणेनं दोघांना दोन थाळींत वाढून घेतलं आणि नवऱ्याला हाक दिली. गणा बाहेर कुठल्यातरी भजनाचं चरण गुणगुणत गव्हाणीवर कडबा तोडत होता–त्याला हाक ऐकूं गेली नाहीं. तशी घाबरटपणानं सगुणेनं आडनांवानं हांक मारली, 'अवं चलाते, सगुना म्हंती भाकरी खायाला या.'

हातांतली कुऱ्हाड उभी धरत सिनेमांतल्या पाटलाची नक्कल म्हणत गणा आंत आला—

'सगुने, हात्तांतली कुराड बग, खुट्टीवली बंदूक बग आन् मंग टगंपना कर...'

त्याच्या हातांतली कुऱ्हाड तिनं काढून घेतली. त्याला खाली बसवत ती म्हणाली, 'ओऽ पाटील, बायकूवर मंग कुराड चालवा. खाली भुईवर या जरा. भाकरी खावा—'

हंसत खेळत दोघं जेवली. थाळींत हात धून गणा घाईघाईनं उठला. पायांत वहाणा सरकवून 'लेट झाला, लेट झाला' म्हणत तो वराचं जोतं उतरला. जातां जातां सगुणा म्हणाली—

'आमुशा हाय आज, मागल्या पावलांनं या—'

'व्हय व्हय...व्हाव्वा रं बायकू.' असं पुटपुटत गणा अंधारांत दिसेनासा झाला.

× × ×

विठोबाच्या देवळांत लोक हळुंहळुं जमत होते. फडांतले नामांकित भजने, टाळवादक आणि साताऱ्याचा नामांकित तबल्जी तुकाराम दयाळाला घेऊन बाजी मुलाणी देवळांत बसला होता. पेटीचा भात्या लोहाराच्या भात्यागत फकाफका ओढत तो पेटी वाजवीत होता. तोंडानं सिनेमांतली 'मोहोबतनें मुझे मारा–' ही कवाली तो म्हणत होता आणि पेटीवर 'वंदेमातरम्' वाजवीत होता. बाजी मुलाणीचा याचसाठीं भजनाचा अट्टाहास असतो. भजनाच्या आधी आणि मधें 'इंटरवेल'ला तो फार दिवसाचं गाणं म्हणून घेतो. आत्ताहि त्याचं तेंच चालूं होतं. आसपासची मंडळी 'भले, भलेऽऽ' म्हणून त्याला चढवीत होती आणि हा स्वरांशी धिंगाणा घालीत होता. तेवढ्यांत देवळाची पायरी चढत असलेले रामजीकाका मुलाण्यावर ओरडले,— 'मुलान्या, तुजा बा बगितला की रं आत्तां घरला—'



मुलाण्याला कांहींच न कळल्यामुळं तो बचाळी फासून बघत राहिला. आणि म्हणाला—

'हाये की. त्यो न्हाई याचा भजनाला...'

'न्हवंऽ, बा गेल्यागत बोंबाल्तोयस म्हूंन म्हनलं...'

मंडळी हसली तसा मुलाणी लाजला. तेवढ्यांत खांबाशी डोळे मिटून बसलेला शिदा तारळेकर किंचाळला—

'आमच्या बाचा आज म्हाळ हाय, आज लावनी झाली पायजेल. माज्यासंगट पंगतींत बोलूं नगा...'

एऽऽ भैकू, भजनाला आलायस कां तमाशाला ?' कुणीतरी त्याच्यावर ओरडलं.

'त्येला लाथा घालून हंकलून द्या. त्ये पिऊन आलंय...'

शिदाला बाहेर काढणार तेवढ्यांत कुणीतरी बोललं, 'सत्यापा आला. मग मंडळी गप् झाली. टाळकर रांगेनं बसले. बुक्क्याचं बोट कपाळाला लागलं. कुलकर्ण्यांच्या बाळानं काळी चारीवर बोटं ठेवली. तुकाराम दयाळानं आपलं नाजूक बोट तबल्याच्या चाटीवर मारलं. संथ धुमाळींत भजन सुरूं झालं. 'जै जैरींमक्रिश्न हाऽऽरी...'

बाहेर अंधार दाटत राहिला आणि देवळांत यमन रंगत राहिला.

× × ×

खाल्वर वाकाळ घेऊन झोंपलेल्या सगुणेला एकाएकी जाग आली. मान तिरकी करून घरट्यांतल्या पांखरागत तिनं कानोसा घेतला. बंद दाराबाहेरली म्हैस उठल्याचा आवाज तिनं ऐकला. दार खडखडत होतं. धूर ओकणाऱ्या दिवट्याकडं बारीक नजरेनं बघत ती म्हणाली–,

'कोन त्येऽ...?'

'तुजा बाऽऽ...' दाराबाहेरनं दणकट आवाज आला.

'तिनं गणाचा आवाज ओळखला. भुईचा आधार घेऊन ती उठली आणि दाराचा कोयंडा तिनं काढला. दार उघडत ती—म्हणाली, 'आसं कां बोलतायसा. भाण्णं झाली कां कुठं भाईर ?'

गणा कांहीं बोलला नाहीं. मागल्या मागं त्यानं दार लावून कडी घातली. सगुणेच्या दंडाला धरून त्यानं तिला दिवळीकडल्या दिव्यासमोर उभी धरली. विचित्र स्वरांत तो तिला म्हणाला, 'माज्या नदरंत बग.'

सगुणेचा गैरसमज झाला. तिला वाटलं आपली आठवण झाल्यानं गणा भजनांतनं उठून आला. उगाचंच लाजत ती खाजगी आवाजांत बोलली—

'अवं. दिवा तरी इझवा...'

आपल्या उजव्या हाताचा अंगठा तिच्या कांखेंत टिच्चून रोवत तो म्हणाला, 'मी कोन हाये ? माज्या नदरंत बग्...'

नवऱ्याची हिसकाहिसकी बघून ती एकदम फिसकारली,— 'असं कां करताय् तरकल्यागत ? गांज्याबिंज्या धिऊन आला काय ?'

गणा आपल्याच तारेंत होता. त्यानं तिला जाम दाबून धरीत विचारलं, 'मला वळकलंस कां ? मी कोन हाये ?'

गणा भजनाच्या नांवाखालीं कुठंतरी झिंगायला गेला होता हें सगुणेनं आतां ओळखलं. त्याला झिडकारून ती म्हणाली– 'हां...हां. वळकलं, निजा आतां.'

पण गणा चलपते आज भलत्याच थराला गेला होता. दुःशासनासारखे तिचे कैंस धरीत तो पुन्हां म्हणाला–

'जादा आवाज करायचं काम न्हाई, मी कोन हाये बोल...?'

लटक्या रागांत सगुणा त्याला बोलली, लई आगावपना नगा करूं. तुमी माजे मालक हांत्. पडा आतां...'

गणानं एकाएकी विचारलं, 'शिरीरंग पैलवान तुला ठाव हाय कां ?'

'मला ठाव न्हाई...' पडक्या स्वरांत ती बोलली.

श्रीरंग पैलवान कोण तें सगुणेला माहीत नव्हतं. पण तें नांव ऐकतांच वाऱ्यानं झाड कापवं तशीं ती कापली. गणा सरळ सरळ तिच्यावर आरोप करीत होता—

'शिरी रंग पैलवान तुला ठाव हाय कां ?

'न्हाई...'

चिडलेल्या गणानं मग लागोपाठ तिला सवाल केले, 'शिरीरंग तुला ठाव न्हाई ? डबंवाडीच्या वढ्यावर त्येच्या संगट तूं बसली न्हाईस ? सांबारवाडीच्या डोंगरांत त्येच्या संगट मोळ्याला गेली न्हाईस ? करंजाच्या जत्रंत त्येच्या संगट बत्तासं–फुटाणं खाल्लं न्हाईस ?

सगुणा थरथरत होती, भीतीचा गोळा तिच्या पोटांत उठला होता. तेवढ्यांत गणानं काडकन् तिच्या कानसुलांत दिली आणि पुन्हां विचारलं, 'डबंवाडीच्या वढ्यावर बसून त्येच्या व्हटांत संक्रांतीचा तिळगूळ दिलास कां न्हाई ? त्यो घेतांना तिळगूळ घ्या व्हटांत आन् मला न्ह्या गोठ्यांत–आसं म्हनालीस कां न्हाई—?'

हेलपाटलेली सगुणा मान खाली घालून उभी होती. सशासारखी भ्याली होती. गणाला हें सगळं कसं कळलं याचा विचार ती करीत होती. एकाएकी ती म्हणाली, 'व्हय ह्ये संमद मी केलंया...'

'त्यो पैलवान कुठं असतो आतां ?' गणानं विचारलं.

'माजं लगीन झाल्याव् कुठं कोल्हापुराकडं गेला म्हनत्यात.'

'मंग कान उघडं ठिऊन आइक. मीच हाय त्यो पैलवान. गोठ्यांतनंचं आलोय्...'

गणाचं तें वाक्य ऐकल्याबरोबर झटका बसल्यासारखी ती मागें सरली. डोळे मोठे करून त्याच्याकडे बघूं लागली.

'वाघा येवढं डोळं केलंस तरी ह्यो पैलवान आतां त्यांत मावणार न्हाई. मी तुजा गणा न्हवं, त्यो बसलाय–तकडं टाळ कुटीत. भजन करीत. ईल आत्तां.—

त्यो बग आलाच. त्येचं पायताण वाजतंय्. त्ये बग दार वाजीवतोय् तो. जा, दार उघड त्येला...'

सगुणा जादू केल्यागत दाराकडं धांवली. आणि खडखडणारं दार तिनं उघडलं. पहाटेच्या गार वाऱ्याची झुळुक तिच्या अंगावर आली. रातभर टाळ कुटून आलेला गणा दारांत उभा होता. तिनं मांगं वळून पाहिलं–दिवळींत दिवा भकभकत होता. त्याच्या पिवळ्या उजेडांत विरत चाललेल्या श्रीरंगाचं हसूं तिला स्पष्ट दिसत होतं. शुद्ध हरपून ती भुईवर कोसळली. तसा गणा पुढं धांवून तिला धरत बोलला–

'सगुना, एऽ सगुना, अग, मी हाय तुजा गना–ऊट–ऊट भेलीस काय...?'

त्यानंतर गणा चलपतेची म्हस गांवकऱ्यांना पुन्हा दिसली नाहीं.

●●●






अनुक्रमणिका






*भारतांतील अत्यंत मागासलेल्या अशा ज्या जंगली जमाती आहेत, त्यांत मंडला जिल्ह्यांतील 'बैगा' जमातीचा समावेश होतो. रानावनाशीं एकरूप झालेल्या ह्या बैगांचीही कहाणी...*

# कजलीबनांतील
# 'बैगा'




—यशवंत शास्त्री

**पुढारलेल्या** जगापासून अत्यंत अलिप्त असणाऱ्या लोकांचें एक आणखी निराळें जग, मैकल पर्वतराजीच्या आसमंतांत वसलें आहे. निसर्गाशीं अगदीं पूर्णपणें एकरूप झालेल्या अत्यंत इमानदार आणि सरळ स्वभावाच्या मानवांचें हें नंदनवन आहे. ह्या जगांत राहणारे लोक जन्मजात शिकारी आहेत. त्यांचें धैर्य अवर्णनीय आहे. इमानदारीसोबतच सत्य हें त्यांचें व्रत आहे. परकेपणाची त्यांच्या मनांतली भावना मावळली म्हणजे, त्यांच्यासारखा सच्चा मित्र उभ्या दुनियेंत दुसरा आढळणार नाहीं. सहा-सात फूट उंचीची एक गवताची छोटीशी झोंपडी हाच त्यांचा निवारा. अशा दहा झोंपड्या असल्या कीं, ह्या नंदनवनांत एक गांव उभें होतें. दूरदूर अंतरावर अशीं अनेक गांवें उभीं असलेला हा प्रदेश, बाहेरच्या जगाहून अगदीं भिन्न आहे. बैगा आणि गोंड आदिवासींनीं निर्माण केलेलें हें निसर्गसंपन्न जग आहे. येथें निसर्गाच्या सौंदर्याला उधाण आलेलें असतें, पण त्या निसर्गाच्या कुशींत अहोरात्र वावरणारे हे बैगा, गोंड आदिवासी अक्षरशः दरिद्री आहेत. मैकलच्या पर्वतराजींतील निसर्गसौंदर्य मी डोळे भरून पाहिलें. तेथील दरिद्रीनारायणांचें दर्शन घेतलें. जें पाहिलें तें सुंदर होतें. जें अनुभवलें तेंहि नवीन होतें. ह्या नवीनतेची कहाणी आम्हां मराठी भाषियांना अद्याप कोणी सांगितलेली नाहीं. मी जें पाहिलें, तें अविस्मरणीय होतें आणि जें अविस्मरणीय वाटलें, तेंच आज विस्तारानें सांगून टाकावयाचें आहे.

मैकल पर्वत अगदींच छोटासा आहे. मंडला तें बिलासपूर ह्या विभागांत तो पसरला आहे. मंडला जिल्ह्याची बरीचशी सरहद्द सातपुडा आणि विंध्याद्री ह्या पर्वतांनी व्यापली आहे. सातपुडा पर्वत जेथें संपतो तेथें मैकल पर्वताची सुरुवात होते; आणि विंध्य पर्वताची जेथून सुरुवात होते, तेथें मैकल पर्वत संपतो. अशा रीतीनें मैकल ह्या छोट्याशा पर्वतानें सातपुडा व विंध्य पर्वत ह्या दोन मोठ्या पर्वतांचा दुवा सांधला आहे. भारतांत जे अनेक पर्वत आहेत, त्यांतील सर्वांत लहान पर्वतांत मैकलची गणना होते. त्याचा आकार किंचित् कमानदार आहे. सातपुडा आणि विंध्य यांच्या मध्यांत उभा असलेला हा छोटासा कमानदार मैकल पर्वत, निसर्गसृष्टींतील 'मेखले' सारखा भासतो. अनेक वर्षांपूर्वीं ह्या छोट्याशा पर्वताला 'कजलीबन पहाड' अशा नांवानें संबोधलें जात असे. नांव खरोखरीच गोड आहे. एकाद्या काव्याच्या सुरुवातीच्या रसाळ पंक्तीसारखें वाटतें. अकबर बादशहाच्या 'ऐन-ए-अकबरी' ह्या ग्रंथांत ह्या विभागाचा उल्लेख 'कजलीबन' म्हणूनच केला आहे.

मैकल उर्फ कजलीबनांतील बैगा जमात कशी निर्माण झाली, ह्यासंबंधीच्या अनेक अद्भुतरम्य आख्यायिका आजहि ऐकावयास मिळतात. जगाची उत्पत्ति होण्यापूर्वीं बैगा निर्माण झाला, अशी ह्या बैगा लोकांची ठाम धारणा आहे. पाश्चात्यांच्या आदाम आणि ईव्ह सारखीच एक दंतकथा ह्या लोकांत प्रचलित आहे. 'नंगा बैगा' आणि 'नंगी बैगी' ह्या दोघांची प्रथम निर्मिति झाली. त्या वेळपर्यंत जगांत मानववंश निर्माण झालेला नव्हता. नंगा बैगा आणि नंगी बैगी यांना ईश्वरानें विचारलें कीं, 'तुम्हांला कुठें रहावयाचें आहे?' तेव्हां त्यांनीं 'आपल्याला घनदाट अरण्यांत निवारा दे' असें ईश्वराला सांगितलें. अरण्यांत जाऊन राहण्याची ईश्वरानें त्यांना परवानगी दिली. त्यांना नंतर दोन मुलें झालीं. पैकीं एक नंतर गोंड झाला आणि दुसरा बैगा म्हणूनच कायम राहिला. गोंड झालेल्या मुलाचे वंशज नंतर खेती (शेती) करूं लागले. नंतर त्यांनीं आपल्याच दोघां बहिणींशीं लग्नें लावलीं. मोठ्या भावाचीं मुलें गोंड म्हणून वावरूं लागलीं आणि धाकट्या भावाचीं मुलें बैगा म्हणून राहूं लागलीं. अशा रीतीनें हळूंहळूं आजची मानव जात निर्माण झाली, असा ह्या बैगा लोकांचा आजहि दाट विश्वास आहे. ह्या आख्यायिकेनुसार, मानववंश प्रथम कजलीबनांत निर्माण झाला! अर्थात ही आख्यायिका आहे.

मैकल उर्फ कजलीबनाचा हा विभाग मंडला जिल्ह्यांत समाविष्ट झाला आहे. मध्यप्रदेश तील बस्तर, सरगुजा, तसेंच आतां मुंबई राज्यांत आलेल्या चांदा, अमरावती व यवतमाळ ह्या जिल्ह्यांतून मागासलेल्या आदिवासींच्या निरनिराळ्या जमाती विखुरलेल्या असल्या, तरी मंडला जिल्ह्यांतील बैगा व गोंड जमाती इतर सर्व आदिवासी जमातींपेक्षां, सर्वांत अधिक मागासलेल्या आणि सुधारलेल्या जगापासून अलिप्त राहिलेल्या आहेत. मंडला जिल्ह्यांतील






ह्या दोन जमाती, भारतांतील सर्व आदिवासी जमातींपेक्षां पुरानतहि आहेत, हें लक्षांत घेतलें पाहिजे. मध्यप्रदेशांतील एकंदर सर्व जंगली जमातींचा विचार केला, तर निरानिराळ्या ' जंगली संस्कृती'चें ह्या लोकांत अजब मिश्रण झाल्याचें दृष्टीस पडतें. ही विविधता इतरत्र आढळत नाहीं.

मंडला जिल्ह्याच्या उत्तरेला जबलपूर जिल्ह्यांतील जंगली टापू जुडलेला आहे आणि सोबतच विंध्यप्रदेशाची (पूर्वींचा) सरहद्द चिकटली आहे. जिल्ह्यांतील अंतर्गत विभागांत सातपुडा पर्वताच्या विशाल शाखांनीं ठिकठिकाणीं प्रवेश केलेला आहे. अमरकंटकच्या पहाडांतून निघालेली नर्मदा नदी ह्या पर्वतराजींतून इतस्ततः वहात गेली आहे. नर्मदा नदी ही ह्या विभागाला मिळालेली एक महान् देणगी असल्याकारणानें, ह्या विभागांत नदीला गंगा नदीइतकेंच महत्त्व व पावित्र्य प्राप्त झालें आहे. क्षेत्रफळाच्या दृष्टीनें, मंडला जिल्हा हा मध्यप्रदेशांतील चवथा मोठा जिल्हा ठरतो. त्याचें क्षेत्रफळ ५०८९ चौरस मैल आहे. इंग्रजांच्या राज्यांत ह्या जिल्ह्यांत केवळ दोनच– मंडला व डिंडोरी–तहसिली होत्या. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर निवास तहसिलीचा आणखी एक भाग पाडण्यांत आला. इतक्या मोठ्या विभागांत इंग्रजांनीं केवळ दोनच तहसिली कां ठेवल्या होत्या, हें एक कोडें आहे. आज मंडला, डिंडोरी व निवास, अशा तीन तहसिली झाल्याकारणानें, शासनाच्या दृष्टीनें सोपेंहि झालें आहे. इंग्रजांच्या आमदानींत कित्येक ठिकाणीं सरकारी अधिकारी कधींहि फिरकले नव्हते, असें चौकशी केल्यानंतर समजलें. मी ही चौकशी करीत असतांना आणखी एक गोष्ट प्रत्ययास आली. सध्याची निवास तहसील घनदाट अरण्यानें व्यापली आहे. तेथें सुसंस्कृत मनुष्य शिरकाव करण्यास धजत नसे. अशा ह्या विभागांत, सरकारी कर्मचाऱ्यांचा पूर्वी शिरकाव झालेला नसला, तरी ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं मात्र तेथें शिरकाव करून घेतला होता. मिशनऱ्यांच्या शिरकावाला भरपूर वाव मिळावा आणि ख्रिस्ती धर्माच्या प्रचाराला मोकळें रान सांपडावें म्हणूनच इंग्रजांनी ह्या विभागाकडे मुद्दामच दुर्लक्ष केलें असावें. सरगुजा, बस्तर वगैरे ज्या ज्या ठिकाणीं, मिशनऱ्यांचा शिरकाव झाला आहे, त्या त्या सर्व ठिकाणीं, इंग्रजांच्या जमान्यांत मुद्दामच अशा प्रकारच्या दुर्लक्षाची वृत्ति अंगिकारण्यांत आली होती. सरकारचें हें दुर्लक्ष मिशनऱ्यांच्या फायद्यांत पडत असे. मिशनऱ्यांच्या स्वच्छंद संचाराला व ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला तेथें अशा रीतीनें वाव देण्यांत येत होता. नेवास तहसिलीची निर्मिति होण्यापूर्वींच ख्रिस्ती मिशनऱ्यांनी सर्वदूर आपलें मूळ धरलें होतें. त्यानंतर मिशनऱ्यांचा संचार आणि त्याचे आज असणारे परिणाम हा एक निराळा विषयं आहे. ओघाओघानें ह्या विषयावर मी बराच प्रकाश टाकणार आहे. जंगली मुलुख आणि जंगली जमाती ह्या बाहेरच्या जगापासून अलिप्त ठेवून तेथें मिशनऱ्यांचा शिरकाव करून देण्यामागें इंग्रज राजकर्त्यांची विशिष्ट भूमिका होती, एवढेंच मला तूर्त दर्शवावयाचें होतें.

मंडला, डिंडोरी व निवास ह्या आजच्या तीन तहसलींतील लोकसंख्या सुमारें सात लक्ष आहे. सुमारें अडीच हजार खेडीं आहेत. अनुसूचित जमातीच्या लोकांची संख्या सुमारें चार लक्ष आहे.

मध्यप्रदेशांतील चवथ्या अनुक्रमाचा हा जिल्हा आजतागायत मागासलेला कां व कसा राहिला ह्याचा विचार करण्यापूर्वी ह्या जिल्ह्याचा थोडा पूर्वेतिहास जाणून घेतला पाहिजे. राणी दुर्गावतीचा हा देश आहे. अहिल्याबाई होळकर, झांशीची राणी लक्ष्मीबाई यांच्या इतकेंच महत्व, मंडल्याचा राणी दुर्गावतीला आहे. इतिहासकारांनीं मात्र, मंडल्याच्या इतिहासाकडे बरेंच दुर्लक्ष केलें आहे. इंग्रजांच्या राजवटींत हा विभाग बाहेरच्या जगापासून अलिप्त ठेवण्याचें जसें धोरण होतें, तसेंच धोरण ह्या विभागाच्या इतिहासासंबंधींहि त्यांनीं अंगिकारलें असावें. काल्पनिक आणि सत्य ह्यातून सत्य वेगळें काढणें आणि वास्तव आधारावर एकाद्या प्रदेशाचा इतिहास लिहिणें हें इतिहासकाराचें कार्य असतें. मंडल्याच्या बाबतींत तसें झालेलें नाहीं. मंडल्याचा खरा इतिहास अद्यापहि संशोधित व्हावयाचा राहून गेला आहे आणि त्या दृष्टीनें इतिहासकारांसाठीं बरेंच कार्य बाकी आहे.

आजच्या मंडला शहराचें खरें नांव फारपूर्वी ' महिश मंडल ' अथवा ' महीशमति ' असें होतें, असें म्हणतात. सहस्रभुजा असलेल्या कार्तवीर्य राजाचा उल्लेख संस्कृत वाङ्मयांत आहे. ह्या कार्तवीर्याची ' माहिशमति ' ही राजधानी होती. त्यानंतर ह्या राजधानीला निरनिराळ्या राजांनीं ' महिश मंडळ ' वगैरे नांवें दिलीं आणि आज ही राजधानी केवळ मंडला ह्या नांवानें ओळखली जाते. कार्तवीर्याचें राज्य फार दूरपर्यंत पसरलेलें होतें. आजचा मांधाता विभाग हा त्याच्याच राज्याचा अंश होता. मंडल्याचा इतिहास आज अंधारांत आहे. इतिहासाच्या ह्या अंधारांत चांचपडत असतांनाच, आज जे पुरातन अवशेष दृष्टीस पडतात, त्यावरून इसवीसनाच्या ६०० शतकापासूनचा थोडा बोध होऊं शकतो. अनेक शतकें निघून गेलीं. महीशमतीच्या पर्वतराजींस त्या घडामोडींचा संपर्क लागला नव्हता. कल्चुरी राजघराणें अस्तित्वात आल्यानंतर, कजलीवनाच्या विभागातहि स्थित्यंतरें होऊं



गृहकृत्यांत दंग असलेली ' बैगा ' आदिवासी गृहिणी








लागलीं. रीवा येथील बघेल राजघराण्याकडून ह्या राजघराण्याचा ११८१ सालांत पराभव झाला आणि त्याच सुमारास गोंड संस्कृतीचा पहिला शिरकाव ह्या विभागांत झाल्याचा दाखला आढळतो. रीवा राजघराण्यांतील जेधेराव गोंड ह्यानें बंड उभारलें होतें. सुरभी पाठक नामक इसमांचा ह्या बंडाला पाठिंबा होता. त्या बंडानंतर कांहीं वर्षांनी गंढामंडलाचा पहिला राजा जादुराई गोंड हा उदयास आला. बालाघाट जिल्ह्यांतील आजच्या लांजी ह्या गांवापासून तो अमरकंटक नजीकच्या रामगड गांवापर्यंत जादुराई राजाचे गोंडी राज्य त्यावेळीं पसरलें असावें. रामगड हें आजहि एक खेडें आहे. परंतु तेथील एका उत्तुंग पहाडावर कांहीं पुरोतन अवशेष दृष्टीस पडतात. तेथें आजहि एक 'बावली' (विहीर) आणि दूरवर आसपास कांहीं शिलालेखहि आहेत. भोसल्यांच्या अमदानींत भोसल्यांच्या फौजा येथपर्यंत आल्या होत्या. भोसल्यांचा इतिहास ज्ञात असल्याकारणानें, रायगडची ही 'बावली' भोसल्यांनीच बांधली असावी, असा समज आहे. परंतु ही विहीर व हे अवशेष पहिल्या गोंड राजाच्या वेळचे आहेत ह्याबद्दल आतां आधारासहित बोलणें शक्य आहे. इतिहास-कारांनीं ह्या अवशेषांचा शोध घेतल्यास, मध्य-प्रदेशाच्या पुरातन इतिहासावर दिव्य प्रकाश टाकणाऱ्या अनेक गोष्टी सहज बाहेर येऊं शकतील. १६६७ मध्यें आणखी स्थित्यंतरें झालींत. राजा हृदयशाह ह्याचा वंश अस्तित्वांत आला. राजा हृदयशाह हा सुद्धां गोंड होता. त्याच्या अमदानींत हिंदु संस्कृतीचा पहिला शिरकाव ह्या विभागांत झाला. संग्रामसागर ह्या नांवाचा एक तलाव त्यानें गढा येथें बांधला होता. तो अद्यापहि दृष्टीस पडतो. ह्या तलावाचें कांठीच भैरवनाथाचें एक विशाल मंदिर उभारलें गेलें. ह्या मंदिराबद्दल एक जुनी आख्यायिका आहे. एक संन्यासी ह्या मंदिरांत आला होता. त्यानें राजाचें रक्त शिवाला वाहण्याची प्रतिज्ञा केली होती. संग्रामशाह हा राजा होता. त्याचा वध करण्याचा संन्याशानें व्यूह रचला. हा व्यूह नंतर फसला. उलट, चौरागड देवाचा संग्राम-शाहला साक्षात्कार झाला. नंतर चौरागड येथें त्यानें एक भव्य किल्ला उभारला, ह्या किल्ल्यांतून आपल्या अनेक देवस्थानांवर नजर ठेवण्याची कामगिरी संग्रामशाह बजावीत असे. ह्या पुरातन चौरागडला आज 'चौरा दादर' अशा नांवानें संबोधलें जातें, आजचा हा 'चौरा दादर' म्हणजे एक कठिण ठिकाण आहे. घनदाट अरण्यांत हें ठिकाण वसलें आहे. आज येथें एक जंगली रस्ता आहे. आणि त्यावरून जीप मोटारनें थेटपर्यंत जातां येते. चवरा दादरला मी जेव्हां गेलो, तेव्हां पुरातन काळीं अशा अवघड ठिकाणीं किल्ला बांधणाऱ्यांच्या करामतीचा








विचार करीत असतांना माझी मति अक्षरशः कुंठित झाली! मोती नाल्यापासून तों थेट मैकल पर्वतांतील अमरकंटकपर्यंत एक छोटा जंगली रस्ता गेला आहे. हा सर्व प्रदेश निसर्गसंपन्न आहे.

गढा–सागर रस्त्यावर सिंगारगड नांवाचें एक पुरातन ठिकाण आजहि दृष्टीस पडतें. दलपतशाहच्या पुरातन जमान्यांत येथें बांधलेल्या किल्ल्याचे अवशेष दृष्टीस पडतात. ह्याच सुमारास सुप्रसिद्ध राणी दुर्गावतीचा उदय झाला. दलपतशाहच्या जमान्यांत राजपूत लोकांशीं तत्कालीन राजांचे संबंध जुळले होते व गोंड राजे आणि राजपूत राजे यांच्यांत 'रोटी–बेटी'चे व्यवहार होत असत. गोंड राजे राजपूत मुलींशीं विवाहबद्ध होत. राणी दुर्गावती ही तशातलींच होती. सिंगारगडच्या किल्ल्यांत ती राहत असे. दलपतशहानंतर राणी दुर्गावतीनें राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. तिनें पन्नास वर्षें राज्य केलें. ह्या अवधींत राज्याची खरी भरभराट झाली. तिच्या राज्यशासनाचा इतिहासहि आज फारसा अवगत नाहीं. जगांत ज्या कर्तबगार स्त्रिया होऊन गेल्या त्यांत राणी दुर्गावतीची गणना करावी लागेल. आपल्या राज्यांत तिनें जलसंचयाची आणि जमीनमहसुलाची योजना प्रथम अमलांत आणली. जबलपूर नजीकचा 'राणीताल' आणि 'चेरीताल' हे पुरातन जलाशय ह्या गोष्टींची साक्ष पटवितात. मंडल्याच्या आपल्या राजधानींत तिनें चवदाशें हत्ती आणून ठेवले होते. आजच्या जमान्यांत तोफा-बंदुकींची लढाई होत असेल; पूर्वीच्या त्या जमान्यांत हत्ती व घोडे हेंच खरेंखुरें फौजी सामर्थ्य होतें. तिच्या राज्यांत समृद्धि होती. सोन्याच्या मोहरा आणि हत्ती अशा स्वरूपांत जमीन महसुलाची वसुली होत असे.

ह्याच सुमारास दिल्लीला मोंगलांचें राज्य होतें. राणी दुर्गावतीच्या राज्याचा आणि तिच्या शासनांतील समृद्धीचा लौकिक दिल्लीपर्यंत जाऊन पोंहचला. राणी दुर्गावतीच्या ह्या राज्य-विस्ताराला आणि समृद्धीला आळा घातला गेला पाहिजे, असें मोंगल सम्राटानें मनांत घेतलें; आणि १५६४ च्या सुमारास असफ-खानानें राणी दुर्गावतीच्या राज्यावर स्वारी केली. 'ऐन-ए-अकबरी' मध्यें राणी दुर्गावतीच्या समृद्ध राज्याचा आणि नंतर झालेल्या ह्या स्वारीचा उल्लेख आहे. १७४२ मध्यें पेशव्यांनीं मंडल्यावर स्वारी केली होती. नंतर मंडला पेशव्यांचें मांडलिक राज्य झालें होतें. कालांतरानें ह्या राज्याची पांगापांग झाल्यासारखी झाली.

स्थानिक गोंड राजघराण्यांत भांडणें जुंपली. राज्याचे लहान लहान विभाग पडून वाटण्या केल्या गेल्या. हरिसिंगाचें राज्य मंडला येथें असतांना मराठ्यांनी (भोंसले) आपले पाय तेथें रोवले. हरिसिंगाच्या मृत्यूनंतर १७३१ मध्यें ह्या राज्याला एकाएकी उतरतीकळा लागली. १७८१ मध्यें सागराच्या राजघराण्याच्या हातीं मंडल्याचीं राजसूत्रें पूर्णतः आलीं व मंडल्याचा सुभा करण्यांत येऊन तो जबलपूरला जोडण्यांत आला. १८८१ मध्यें ब्रिटिश व मराठा यांचें युद्ध आटोपलें आणि मंडला ब्रिटिशाच्या ताब्यांत आला. मराठे ब्रिटिशांना शरण गेले होते. १८८१ पासूनच मंडला ही सिवनीची एक तहसिल ब्रिटिशांनीं करून टाकली. ह्या वेळी मंडला येथें मालगुजारी प्रथा प्रथम आली.

१८५७ चें नंतर बंड झालें. मंडल्याच्या मालगुजारानेंहि बंडांत भाग घेतला. त्यानें सरकारला सारा देण्यास नकार दिला व त्यानें 'मंडल्यांतील इंग्रजी राज्य संपलें आहे!' अशी घोषणाहि केली. बंडाचें हें वारें सर्वत्र फोंफावलें होतें. सोहागपूरचा ठाकोरहि त्यांत सामील झाला होता. ब्रिटिशांच्या फौजांनीं बंडखोरांवर मात केली. ब्रिटिश सैन्य मंडल्यांत घुसलें. त्यापूर्वी तें शहापूर येथें आलें होतें. रामगड येथें सैन्य शिरलें तेव्हां तेथील जमीनदारीण बाईनें राणी दुर्गावतीप्रमाणेंच स्वतःच्या उरांत खंजीर खुपसून आत्महत्या केली होती. रीवाचा राजा ब्रिटिशांना फितूर झाला होता. सर्वच वाताहत झाली होती. थोड्याच अवधींत बंड शमलें व सर्वत्र शांत झालें. १८९७ मध्यें भयंकर दुष्काळ पडला. दुष्काळाची लाट ओसरल्यानंतर ब्रिटिशांचा खरा अंमल मंडल्यांत चालू झाला.

आणि कजलीबनांत नांदणाऱ्या पूर्वापार स्वातंत्र्याची अशा रीतीनें इतिश्री झाली. कजलीबनांतील पूर्वस्वातंत्र्याचें वैभव तेथील आजच्या अवशेषांच्या स्वरूपांत दृष्टींत भरतें. डिंडोरी तहसिलींतील कुकरमठ आजही जाऊन पहा. तेथील देवालयांतील व देवाल्यावरील शिल्प तुमचे डोळे दिपवून टाकील. ह्या पुरातन इमारती आज ढांसळत आहेत. ह्या ढांसळणाऱ्या बुरुजांखाली मध्यप्रदेशाचा प्रगाढ पुरातन इतिहास दडलेला आहे. ह्या इमारतीकडे सरकारचें लक्ष प्रथम जोपासनेच्या दृष्टीनें आणि नंतर इतिहास संशोधनाच्या दृष्टीनें वेधावयास हवें. कुकरमठ येथील हें वाताहतीच्या स्थितीस जाऊन पोंचलेलें वैभव पाहिलें म्हणजे वाटूं लागतें, आमच्या पुरातन संस्कृतीचें वैभव कोलमडून पडत आहे–उद्यां मातींत मिसळून जाईल!–त्या वैभवाचें नांवनिशाण राहणार नाहीं आणि त्यामागील इतिहास कायमचा लयाला जाईल! आजच कित्येक मूर्ति धुळींत पडल्या आहेत. हें सर्व कोरीव शिल्प पाहिलें कीं, तें जवळपासच्या काळांतलें नसून, राजपूत संस्कृतीचें असावें, असें वाटूं लागतें. राणी दुर्गावती मुळांत राजपूत होती. कोणी सांगावें? राजपुतांचाहि मंडल्याच्या इतिहासाशीं दुसरा संबंध असेल. कुकरमठच्या अप्रतीम देवाल्यासंबंधीं अनेक गोष्टी बोलल्या जातात. पांडवांचें येथें वास्तव्य होतें, असें म्हणतात. त्यांनीच हें देवालय रातोरात तयार केलें आणि पहाटचा कोंबडा आरवण्यापूर्वीच त्यांना ही जागा सोडून जावें लागलें म्हणून त्यांनीं ह्या ठिकाणाला 'कुकरमठ' असें नांव दिलें व ते निघून गेले, अशी एक आख्यायिका आहे. मोतीनाला विभागांतील घनदाट अरण्यांतहि कांहीं ठिकाणीं पुरातन अवशेष आहेत. येथें एक मूर्ति माझ्या पाहण्यांत आली. ही मूर्ति उभी असून, ती एका स्त्रीची आहे व तिच्या हातांत एक छोटेसें वासरूं आहे. ही मूर्ति येथें कशी आली हें मात्र कोणालाच अद्याप ठाऊक नाहीं. मंडल्याच्या किल्ल्यांत आणि रामगड येथें गोंड संस्कृतीचे अवशेष विपुल प्रमाणांत आहेत. बंजार आणि नर्मदा ह्या नद्यांच्या संगमावर मंडल्याचा हा पुरातन किल्ला उभा आहे. आज तो मोडकळीला आला आहे. परंतु कांहीं प्रवेशद्वारें व मीनार अद्याप शाबूत आहेत. नर्मदा व बंजार ह्या नद्यांचा जेथें संगम होतो, त्या ठिकाणीं गंगा–यमुनेच्या संगमाची अभावितपणें आठवण होते. बंजार नदीचें पाणी उन्हाळ्यांत सुकून जातें व नर्मदेला मात्र भरपूर पाणी असतें. नर्मदेला बंजार नदी ज्या ठिकाणीं येऊन मिळाली आहे, तेथें एक सरळ रेषा आजहि पडलेली दिसते व त्यावरून नर्मदा कोणती व बंजार कोणती हें सहज ओळखतां येतें. गंगा-यमुनेच्या संगमावर जसा प्रयागचा किल्ला उभा आहे, तसाच नर्मदा–बंजारच्या

...पान ४१ वर




—श्रीपाद काळे

—**मोटार** उभी राहिली, आणि आंतलीं गचके हिसके खाऊन हैराण झालेलीं माणसें सावरल्यासारखीं झालीं...जिथें जायचें होतें, तिथलीं चार पांच माणसें एकदम मोटारीपाशीं आलीं...आंतलीं माणसें स्वतःला सावरीत खालीं उतरूं लागलीं...सामानाचे बोजे, ट्रंगा टपावर होत्या... कुणीतरी उतरतांना साधी हात पिशवी बाहेर आणूं लागलं, तेव्हां बाहेरचीं चार-पांच माणसं एकदम म्हणालीं, 'असूं दे-आमचीं माणसं सारं सामान घेतील-तुम्ही उतरा—'

—शांता खालीं उतरली. मोटारीनं उधळलेला धुरळा अजून पुरता नीट जाग्यावर आला नव्हता...यांत कुणाचे कपडे स्वच्छ आहेत, कुणाचे नेटके आहेत—कुणाचे डोकीवरचे केंस विस्कटूं नये याची माहिती तो धुरळा घेत असावा...बरोबरच्या मोठ्या पुरुष मंडळीशीं उतरून घेण्यासाठीं आलेलीं माणसें लाचारल्यासारखीं बोलत होतीं – काळजी दाखवित होतीं—शांताच्या नजरेंत हा लहानसा स्टँड, जवळचीं भुरट्यासारखीं दुकानं—झडलेल्या माणसासारखी कोपऱ्यांतली शाळा, आणि बाजूला रेंगाळणारीं पांचपंचवीस माणसें एकदम आलीं...पुरुषोत्तम पंतांशीं बोलतांना 'आपले हेऽ' करण्याची सवय असलेला माणूस हा उद्यां लग्न होणाऱ्या मुलीचा जवळचा कोणीतरी असावा, असा तिनें कयास केला, आणि सारखा मनगटी घड्याळाकडे पहात असलेला, हा मुलीचा चुलत भाऊ असावा, असेंही तिनें ठरवून टाकलें—

टपावरचं सामान उतरलं जात होतं...वरचं सामान खाली देतां देतां गोणांत बांधलेला एक बोजा खालीं पडला, तेव्हां पुरुषोत्तम पंतांशीं लाचारपणें बोलणारा गृहस्थ हातांतली काठी उगारून म्हणाला, 'शंकऱ्या, भडव्या तुझ्या हाताला काय जीव आहे की नाहीं?'

—आणि म्हणून शांतानें सामान खालीं घेणाऱ्या माणसाकडे पाहिलं. उगारलेल्या काठीनें त्याचें अंग खरंच चोरल्यासारखें झालें. दोन्ही हात आड घेऊन आपलें डोकें त्यानें लपवल्यासारखें केलें होतें—दोन्ही पाय दुमडल्यासारखें झाले होते—सगळ्यांनीच शंकऱ्याकडे तिरस्कारानें पाहून घेतलें—सगळ्यांच्या नजरा दुसरीकडे वळल्याचें त्यानें हाताच्या फटींतून पाहिलें, आणि मग खालीं पडलेल्या गोणत्याला हात घातला—

—तरी शांताची नजर पुरती दुसरीकडे वळली नव्हती—कांहींतरी अनपेक्षित, धक्का देणाऱ्या गोष्टीकडे पहावें, तसें ती शंकऱ्याकडे पहात होती—कमरेखालीं गाठ मारलेला पंचा नेसणारा, अंगांत जें होतें, तें फाटक्या जाळ्यासारखें होतें—त्याचा कधीचा गोरावर्ण करपलेला वाटत होता...त्याच्या उण्यापुऱ्या उंचीला मानेजवळ पोंक आलें होतें—दाढी वाढली होती....गालफडें बसलीं होतीं. आणि डोळ्याखालचें हाड चिडल्यासारखें वर आलें होतें—उंच मानेला गळूं आल्यासारखें टोंकाचें हाड तसेंच दिसत होतें, आणि कानाजवळचा चामखिळ वैर धरल्यासारखा दिसत होता.

—मोटारच्या रस्त्यापासून जिथें उतरायचें होतें, तें घर तरी अर्धा मैल होतें—शंकऱ्या सामान आणत होता...उचलत नव्हतें, एवढें सामान डोकीवर घेत होता, आणि त्याच्या नाकातोंडातून फेस येतो आहेसा वाटत होता—घामानें डबडबला होता—डोकीवरून ओघळणारा घाम डोळ्याशीं थांबत होता. आणि डोळ्यांची उघडझाप करायला पण कठीण होत होतें—तिन्हींसांजा झाल्या होत्या, उतरलेल्या माणसांशीं लाचारासारखें बोलणाऱ्या माणसाच्या मागें मागें शंकऱ्या करूं लागला. पहिल्या पहिल्यानें त्यानें शंकऱ्याकडे लक्षच दिलें नव्हतें—पण शंकऱ्यानें त्याची पाठ सोडली नाहीं—तो कांहीं खाजगी बोलण्याकरतां पुरुषोत्तम-पंतांबरोबर झोपाळ्यावर बसला, तर झोपाळ्याची कडी धरून एका पायावर शंकऱ्या उभा राहिला—शेवटीं त्यानें कनवटीचे काहींतरी नाणें काढून ओवाळून टाकावें, तसें शंकऱ्याच्या हातावर ठेवलें. शंकऱ्यानें एकदां त्या नाण्याकडे बघितलें, आणि तोंड हिरमुसें केलें. शंकऱ्या बाजूला व्हायला तयार नव्हता, शेवटीं तो लाचारीनें बोलणारा माणूस हात उगारून म्हणाला, 'चालतो हो गाढवा. दुपारी दोन पोरांना घेऊन गिळलास तें कुठें गेलें?...'

शंकऱ्या फरफट्या पायानें बाजूला झाला. शांता हें पहात होती—पहात होती, आणि तिचें मन आक्रसत होतें....कोणीतरी तिला अनाहूतपणें माहिती पुरविली होती, कीं त्याचें लग्न झालें आहे—गेलें वर्षभर इथेंच तो हमाली करतो—

—शांता वावरत होती...सामान लावत होती. मध्येंच पुरुषोत्तमपंत कांहींतरी विचारून जात होते—रात्रीं व्याही जेवण व्हायचें होतें—मधुकरला ती आईच्या ठिकाणीं होती...या लहान दिरावर तिची जास्त माया होती—

—आंत बाहेर झगझगीत बत्त्या लागल्या, त्या प्रकाशांत शंकऱ्या पाठमोरा गेला—खरेंतर घरांत स्वयंपाकाचा वास सुटला होता—लाडू चिवड्याच्या बशा सर्वांना वाटल्या जात होत्या...लाचारलेल्या गृहस्थानें चहाचाच आग्रह सर्वांना केला होता.....शांताच्या जिव्हारीं शंकऱ्याला हांक मारायचें आलें होते—पण तो पाठमोरा गेला, आणि ती गप्पच राहिली...कोरें भांडें पाण्यानें भरावें, आणि धार कुठें फुटूंच नये, असें झालें होतें—व्याकुळतेनें आपलें मन काठोकाठ भरतें आहेसें तिला वाटत होतें...

—आई-बाप नसलेल्या पोरक्या दिराला एवढी माया देऊंच नयेसें तिला वाटूं लागलें—कासवीसारखें मायेचे-सहानुभूतीचे हातपाय



अनुक्रमणिका

पोटांत घ्यावें, आणि स्वस्थ बसावें—उद्यां कांहींतरी क्षुल्लक कारण घडेल, आणि मोकळा केलेला मायेचा—प्रेमाचा ओघ बांध घातल्यासारखा मध्येंच थांबेल—

—आणि मग ती अबोल झाल्यासारखी झाली, पुरुषोत्तमपंत कांहींतरी विचारायला आले, आणि ती कांहीं बोललीच नाहीं, दोनदां तिनदां त्यांनीं विचारलें, आणि नाइलाज झाल्यासारखें तिनें 'हूं' केलें—शेवटीं मधल्या जावेनें तिला विचारलें, 'बाई, तुमचें काय झालें ?'

'कांहीं नाहीं !'

'कपाळ दुखतें ?'

'नाहीं—'

'तिकडच्या माणसांपैकीं कोणी कांहीं बोललें का ?'

'नाहीं—'

–शंकर पाठमोरा गेला, तो तिला सारखा दिसत होता–बत्तीच्या उजेडांत त्याची सावली लांब लांब होत गेली होती–

–रात्रीं सारें आटोपलें, तेव्हां दीड वाजून गेला होता. मोटारींत हिसके गचके बसलेलीं माणसें केव्हांच झोपलीं होतीं. कोणीतरी बत्तीची चावी सैल केली होती, आणि गजबजलेलें घर शांत झालें होतें–शांतानें मोकळी जागा होती, तिथें एक चादर अंथरली, आणि ती आडवी झाली–डावा हात तिनें कपाळावर घेतला. झोपण्या आधींच जांभई दिली...आणि डोळे मिटले–डोळे मिटले आणि शंकरची पाटमोरी आकृती सावली सुद्धां तिच्या डोळ्यापुढें आली...

–शंकऱ्या तिच्या मिटल्या डोळ्यापुढें रूप बदलून आला... गोऱ्या वर्णाचा, पाणीदार डोळ्याचा–त्याची भरलेली उंच देहयष्टी चालायला लागली, कीं डोळे भरून पहावी–बोलतां बोलतां त्याचे पाणीदार डोळे कुठेंतरी तरंगत...त्याला कुणीतरी फार फार मोठें व्हायचें होतें–मोठा व्यापारी व्हायचें होतें- कारखानादर व्हायचें होतें शाळेंत असा तो थोडाच शिकला होता पण इतर माहिती त्याला फार होती...मुंबईला त्यानें बऱ्याच नोकऱ्या केल्या होत्या–आणि नोकर ही कल्पना सहन न होऊन त्यानें त्या सोडल्या होत्या— त्याला कोणीही हुषारच म्हणत होतें–कोणतीही गोष्ट आपल्या आवाक्यांत नाहीसें त्याला वाटतच नव्हतें—

—त्याच्या हुषारीबद्दल आपल्याला फारफार वाटायचें–तो बोलत राहिला, की टक लावावीशीं वाटायची–एकदां त्यानें आपले दोन्ही हात हातांत घेतले, आणि तो म्हणाला, 'शांता, तूं माझ्या आयुष्यांत आलीस, तर मी आकाशाला गवसणी घालीन–'

...आणि आपल्यालाही वाटायचें, आपण शंकरशींच लग्न करावें, आणि त्याला मोठें होऊं द्यावें–त्याकडे पैसा नाहीं, म्हणून तो थबकल्यासारखा झाला आहे–नाहींतरी बाबा माझ्या लग्नासाठीं दोन हजार रुपये खर्च करणार आहेत, तसेंच स्थळ आलें, तर आणखीही पांचशें रुपये खर्च करण्याची त्यांची तयारी आहे–मग लग्न मोजक्या माणसांत उरकावें, आणि सारी रक्कम त्याच्या स्वाधीन करावी—

शंकर मोठा झाल्याचीं कितीतरी स्वप्नें आपण पाहिलीं—एकदां त्याच्याच म्हणण्याप्रमाणं त्याच्या मोटारींतून फिरत होतों—कलकत्त्याकडे त्यानें नवीन कारखाना उघडला होता–तिथें सुद्धां स्वप्नांत एकदां जायची आपण तयारी करत होतो–

तो म्हणत होता, आपल्या बाबांना हें सारें समजावून सांगतशी वेळ येण्याची आपण वाट पहात होतों–एकदां दोनदां तसा प्रयत्न केलाही, पण त्यावेळीं तोंडांतून शब्दच बाहेर पडले नाहींत—

*कांहीं तरी अनपेक्षित धक्का देणाऱ्या गोष्टीकडे पहावें, तसें ती शंकऱ्याकडे पहात होती. आणि रात्रीं शंकरच्या सहवासाच्या गोड स्वप्नाची धुंदफुंद रंगरेखा रंगवीत होती...पण*

*शंकरच्या दूर गेलेल्या लांब लांब सांवल्या तिची व्यथा आणखीच गहरी करीत होत्या......*

---

—आणि एक दिवस बाबांनीं पुरुषोत्तमपंतांचें स्थळ आणलें–पत्रिका जमली, आणि कांहीं बोलायच्या, कांहीं सांगायच्या आंतच लग्न ठरलें. हां हां म्हणतां तयारी झाली, आणि लग्न झालें सुद्धां—

—पुरुषोत्तमपंतांचं स्थळ मिळाल्याबद्दल जवळच्या माणसांनीं किती कौतुक केलं–भाग्याची म्हटलं...पुढें शंकरचें लग्न झाल्याचें कळलें...जेव्हां जेव्हां माहेरीं जावें, तेव्हां तेव्हां त्याचा एक धंदा तरी आंगलट आल्याचं कळत होतं...दोन मुलं झालीं होतीं, आणि घरांत वेळेची पंचाईत वाढत होती—बाबा म्हणत शंकर हुशार आहे–बुद्धिमान आहे पण कमनशिबी आहे—नको एकदा मानी आहे—परदेशी असता, तर कुठच्या कुठच्या कुठें गेला असता–जिथें तिथें



पैशाशीं तो अपुरा पडतो–मग स्वतःवर चिडतो–अलीकडे म्हणे तो बायकोला बेदम मारतो–पोरांची तंगडं धरून कोपऱ्यांत टाकतो–सारखा विख्या ओकतो—

शांताला वाटत होतं, आपल्याशीं लग्न झालं असतं, तर त्याच्या आयुष्याचं असं मातेरं व्हायला आपण दिलं नसतं–तो कोणीतरी मोठा झाला असता, आणि त्यानं सर्वांना दिपवलं असतं–पण दुसऱ्याचं बरं करणं सुद्धां नशिबीं लागतं—

–बत्तीच्या झगझगीत प्रकाशांत लांब सावली पसरून पाठमोरा चाललेल्या शंकरला हांक मारतां आली नव्हती...घरांत अन्न शिजत होतें–लाडू–चिवड्यांनीं भरलेल्या बशांना पाय लागत होते आणि हातांतल्या नाण्याकडे बघत शंकर पाठमोरा चालला होता.

शांताला वाटलं, आपण त्याला हांक मारली असती तर ?–त्याला खाऊं घातलं असतं तर–त्याच्या बायको–मुलांची चौकशी केली असती तर ?...तर–तर–तिची अवस्था तर पंख कापलेल्या पक्षासारखी होती–भरपूर खावें–चांगलीं लुगडीं नेसावीं, गळा वाकेपर्यंत दागिने घालावे–आणि मोठेपणाला जोपाशींत रहावें, एवढीच तिची भूमिका उरली होती. ओशाळलेलें बोलणाऱ्या माणसाशीं बोलत रहाणाऱ्या पुरुषोत्तमपंतांच्या देखत; शंकराला हाक मारणें शक्यच नव्हतें–एका हमालाला मुद्दाम परक्यांच्या देखत हाक मारणे, खाऊं घालणें, त्याच्या मुलामाणसांची चौकशी करणें–इथेंतर तिचें नातें वेगळें होतें–नवऱ्या मुलाच्या आईच्या ठिकाणीं ती वावरणार होती–पायघड्यावरून चालणार होती, आणि मी मी म्हणणाऱ्यांना वाकवणार होती–

शांताला झोप लागत नव्हती. कंदिलाच्या भुऱ्या प्रकाशांत आडवी तिडवीं झोपल्लीं माणसें भुतासारखीं दिसत होतीं...कांहींचीं तोंडं उघडीं होतीं–कांहींचे हातपाय कुठेंतरी–कोणाच्या तरी अंगावर पडले होते...सारखं सारखं केसाच्या वळणाला जपणाऱ्या मधल्या जावेचे केस तोंडांवर आले होते–सामान पुरतं लाऊन झालं नव्हतं–फराळाचे डबे नीट ठेवायला मिळाले; नव्हते–मधली जाऊ झोपतेवेळीं म्हणाली होती, 'मरूं दे आतां–सकाळीं बघूं–'

—आतां उंदीर तिथें खडबडत होते–धांवत होते–कुणाला तरी उठवीन म्हटलं, तर या वेळीं कोणी उठणार नव्हतं– थोरल्या नणंदेला उठवली, तर डोळे मिटून कुठेंतरी चालायला लागेल—

—या वेळीं प्रमिला हवी होती हाक मारण्याचा अवकाश, कीं चटकन् उठली असती,–किंवा सारं नीट लावल्याशिवाय झोपलीच नसती—

—शांताच्या डोळ्यापुढें प्रमिला आली...गुलाबाच्या टवटवीत फुलासारखी हसतमुख–एवढीशी मूर्ति–एवढंसं तोंड, सरळ नेटकं नाक, आणि एवढेसे डोळे—केस मोकळे करून पुढ्यांत वेणी घालायला बसली, कीं तें एवढंसं तोंड झाकाळून जायचं—भिंगरीच्या हातानं कामं करायची–गतवर्षीच तिचं लग्न झालं. चांगली थोरामोठ्या-घरची लेक, मॅट्रिकची परीक्षा दोन महिन्यावर आलेली असतांना लग्न झालं—भरल्या घरांतली बापाची लेक वाजत गाजत गरीबाकडे आली......गुपचूप लग्न उरकलं गेलं......ती नवऱ्याकडे आली. इथें शेतीभाती...वर्षांचे बारा महिने मरेमरेपर्यंत काम करावें, आणि काळजी करीत खावं,...शांताच्या घराजवळ तिचं घर–तिचा नवरा हें पुरुषोत्तमाचें कुळ...पूर्वीं–प्रमिलेचा नवरा बराचसा इथें असायचा. घरच्यासारखा. हे तीन भाऊ; त्यांतलाच तो चवथा. घरांत लग्नकार्य झालं, तर तो जबाबदारीनें सारं करायचा...पण कुळ कायद्यांत वाद झाले, आणि त्याला वेगळे सुरू भेटले–फारसा आतां तो इकडे येत नव्हता...पण प्रमिला येत होती—तिला स्पष्ट कोणी नको म्हणत नव्हतं...येत होती, आणि शांताच्या हातांतलं कोणतंही काम उचलत होती...तिला कांहीं येत नव्हतं असं नव्हतंच मुळीं. शांताला सुद्धां तिचा फार लळा लागला...प्रेमिलेशिवाय एकही अपूर्वाईची वस्तू तिच्या घशाखालीं उतरत नव्हती...थोरा-मोठ्याकडची मुलगी सारं विसरून गरीबीशीं एकरूप होते, याचं शांताला विलक्षण कौतुक वाटायचं. परक्या माणसानं नातं विचारलं, तर शांता प्रमिला बहीण म्हणून सांगे...दुपारीं उष्टं–खरकटं झालं कीं प्रमिला इकडे येई...शांताजवळ ती आडवी होई, आणि शांता तिला थोपटी...तिचं लहानसं तोंड कुरवाळी, केसावरून हात फिरवी...केव्हां शांता तिला म्हणे, तुझी मंगळागौर मी करीन. गांवांतल्या साऱ्या जणींना बोलवीन...तूं मनसोक्त फुगड्या घाल—

—प्रमिला ते ऐके, आणि हरखून जाई. जें कोणाजवळ बोलायचें नाहीं, तें ती शांताजवळ बोले. एवढी समंजस मुलगी शांतानं अद्याप पाहिलीच नव्हती–शिक्षण अपुरं राहिलं, म्हणून तिला खंत नव्हती. गरीबीचा तिटकारा तिनं केला नव्हता–नवऱ्याबद्दल ती वाईट बोलत नव्हती.

—चार महिन्यापूर्वीं तिच्या नवऱ्याला जमीन मिळाली, आणि दोन्हीं घरांचं वितुष्ट आलं–त्या घरांतल्या एकाही माणसानं इकडे फिरकता नये, असं पुरुषोत्तमपंतांनीं बजावलं. प्रमिलेचा नवराही दुरुत्तरानं बोलला, आणि तेव्हांपासून प्रमिला येत नाहींशी झाली...त्यांच्या अंगणांतलं शांताला एका खिडकींतून सारं स्पष्ट दिसत होतं–प्रमिला एकटी एकटी मागच्या दारच्या दरवाज्यांत उभी असे–केव्हां जांभया देत असे–चार महिन्यांत मुळाला वाळवी लागलेल्या झाडासारखी ती वाळत जात होती...मधुकरचं लग्न ठरल्यावर हपापलेल्या नजरेनें ती इकडे बघत होती...एका झेपेनं पुढं जाऊन प्रमिलेला कवटाळावी, असं शांताला वाटत होतं—तिची अवस्था मनोमन शांताला कळत होती, आणि शांता व्यथित होत होती–झेप घेण्याकरितां ती हात पसरी–पण तिचे पंख कोणीतरी कापले होते—

—शांता अंथरुणावर तळमळत होती...कंदिलाचा भुरा उजेड...आडवीं तिडवीं पडलेलीं भुतांसारखीं माणसें—

—कितीतरी रात्र असतानाच शांता उठली...लग्न दुपारचं होतं. तोंड धुवून तिनं चहा करून घेतला, आणि एकेक आवरायला लागली. कालच्या लाडू–चिवड्याच्या बशा एक दोन विसळायच्या होत्या—आज कोणीतरी पाणी भरायला, उष्टीं काढायला बाई देणार होते–विहीर दूर होती, आणि सारं पाणी हात रहाटानं काढायचं होतें–

चांगलं उजाडल्यावर बाकीचीं माणसें उठलीं. तोंवर सारं सामान लाऊन झालं होतं–

पाणी आणायला बाई आली...तेलकट रंगाची...शांताला तिला बघून कसेंसेंच वाटलें–ही बाई केवढी थोराड हाडाची होती. पण पोटाला महाग होती, हें स्पष्ट दिसत होतें–दारिद्र्यानें तिचें सारें मांस ओरपून काढलें होतें–कोणी तरी सांगितलें, कीं तिला बाळंत होऊन एक महिनाच झाला होता–आणि ती शंकऱ्याची बायको होती. पोटाला घालावें, आणि हवें तेवढें काम करून घ्यावें—

अनुक्रमणिका






दोन्ही घागरीनें ती पाणी भरत होती. चहाचीं भांडीं तिनें चक्क घासून आणली. आंघोळ केलेल्या पुरुषांचे कपडे तिनें धुवून घातले... शांताला एक कळून चुकलें, अशीं माणसें ओल्या ओठांनीं, भुकेल्या नजरेनें सारें पहात असतात. हावरटासारखें करीत असतात-पण त्यांतली ही नव्हती...व्हाईट काम करतांना ती अलिप्त नजरेनें पाही, तशीच पुण्याहवाचनाकरतां शांतानें शालू नेसला, गळाभर दागिने घातले, तर शांताकडेही तिनें अलिप्त नजरेनेंच पाहिलें. यांतलें आपलें काहीं नव्हें, हें रक्ताच्या थेंबाथेंबात भिनल्यासारखें-घरीं जाऊन तान्ह्या पोराला ती पाजून केव्हां आली, कळलें नाहीं—

दहा वाजतां सगळ्यांचे फराळ झाले-मग जेवणं उरकायचीं होतीं, आणि मग इतर विधी व्हायचे होते-फराळाला पंगतच्या पंगतच बसली होती.

शंकऱ्याच्या बायकोनें भरभर फराळाचीं पानं उचललीं...उचलतां उचलतां लोकांनीं टाकलेले लाडू तिनें ओटींत घातलेलेही शांतानें पाहिलें. शांता आपल्याकडे पहाते आहे, हें तिच्या लक्षांत आलें, आणि ती चट्कन पुढें आली, खाली मान घालून हलक्या आवाजांत म्हणाली, 'हे मोटारीवर गेले आहेत-भुकेनें घरीं येतील-दोन पोरं आहेत म्हणून—'

'बरं बरं' शांता चट्कन म्हणाली...

...पण मधल्या जावेच्या नजरेतून शंकऱ्याच्या बायकोची चोरी सुटली नाहीं-तिनं पाहून घेतलं, आणि मग चार बायका जमवून भरलेली ओटी मोकळी करायला सांगितलें—

पंख तुटलेल्या पक्षिणीच्या नजरेनं शांता हें सारें पहात होती-शंकरच्या बायकोच्या डोळ्यांतल्या टिपानं व्याकुळ होत होती—कमनशिबाच्या टोचणीनें व्यथित होत होती— ●●●

**बैगा**

...पान ३९ वरून

संगमावर मंडल्याचा हा किल्ला उभा आहे. मंडल्याचा किल्ला उभारला गेल्याची नक्की तारीख आज उपलब्ध नाहीं. सतराव्या शतकाच्या अखेरीस नरेन्द्रशहानें तो बांधला असावा. त्यानंतर सध्यां दिसणाऱ्या ह्या किल्ल्याची भिंत मात्र भोंसल्यानं बांधली होती. पेंढाऱ्यांच्या सुळसुळाटापासून रक्षण व्हावें म्हणून भोंसल्यांनीं ही दक्षता घेतली होती. गोंडांचा जुना राजवाडा आज अगदीं नेस्तनाबूत झाला आहे. नर्मदेच्या कांठावरील घाट मात्र आजहि गोंड राज्याच्या वैभवाची साक्ष पटवितो. रामगड येथील गोंड संस्कृतीचें वैभव दृष्टीस पडतें. १६३० सालात रामगड ही राजा हृदयशाह याची राजधानी झाली. येथील पुरातन अवशेष मात्र अगदींच साधे आहेत.

मंडल्याचा इतिहास ओझरत्या स्वरूपांत वाचकांसमोर ठेवला आहे. मंडला निसर्गसौंदर्यासाठीं मशहूर आहे.तसाच तो त्याच्या इतिहासासाठींहि मशहूर आहे. आर्यावर्तातील संपूर्ण संस्कृतीचें एकीकरण फार पुरातन काळांत ह्या कजलीवनात घडून आलें असावें. आज तो इतिहास विसरल्यासारखा झाला आहे. ऐतिहासिक अवशेषांच्या रूपानें त्याचें थोडेफार ज्ञान होऊं शकतें, इतकेंच. अद्यापहि संशोधनाला तेथें भरपूर वाव आहे. कजलीवनाच्या इतिहासावर अशा रीतीनें ओझरती नजर टाकल्यावर तेथील आजच्या जंगली जमातीसंबंधींची माहिती अधिक रोचक वाटेल, असा विश्वास वाटतो. भारतांतील अत्यंत मागासलेल्या अशा ज्या जंगली जमाती आहेत, त्यांत मंडला जिल्ह्यांतील 'बैगा' जमातीचा समावेश होतो. रानावनाशीं एकरूप झालेल्या ह्या बैगांची कहाणी आतां सांगून टाकायलाची आहे.

—क्रमशः

## भीष्माचा डोंगर

...पान ९ वरून

'शिवीगाळ करूं नको. जड जाईल.' भाऊ कुळकर्ण्यांची थंड सूचना.

'वहाणेनं थोबाडला असता रे! पण वयानं पडलास वडील.'

'येऊं दे माझ्या द्वारक्याला. मग सांगतों बरोबर!' भाऊनं दम भरला.

'तुला काय वाटतं? मी भितो त्या नालायकाला?' दाजीनं विचारलं. 'ठीक आहे. होऊन जाऊ दे. येतो आहेच तर येऊं दे तुझा पोर. तुझ्यासमक्ष या वहाणेनं त्याला नाहीं फोडून काढला तर दाजीचं नांव दुसरं!'

आणि कपाळांत अशी राख घालून दाजी नाबर तिथंच पारावर भाऊ कुल्कर्ण्यांसमोर ठाण मारून बसला.

एव्हाना बरीच गर्दी जमली होती. भाऊ कुळकर्ण्यांची आणि दाजी नाबराची बाचाबाचीत एकायाला कामं टाकून लोक धांवली. गोष्टी इतक्या थराला जातील अशी कोणालाच कल्पना नव्हती. द्वारकानाथ म्हणजे कसला गुंड! दाजीला हें काय वेड लागलं आहे लोकांना कळना. उगाच नसतं अपद्वारणा! दाजीची ती समजूत काढूं लागलीं. सांगूं लागली, 'दाजी काय हे? तुम्ही आपले जा कसं! पंचायती नकोत.'

'ऐकलत ना! आतां कांहीं बोलूं नका. फक्त बघा' दाजीनं त्यांना गप्प बसवलं.

खुद्द स्वतःच्या पोरीचंसुद्धां त्यानं ऐकून घेतलं नाहीं. रडकुंडीला येऊन वासंती बापाची मनधरणी करीत होती. आणि दाजी हात झाडीत तिच्या अंगावर आला, 'जा, नीघ! तुझं काम नाहीं.'

'मी नाहीं जाणार–तुम्हांला इथं एकटं टाकून.' ती हुंदके होती.

'जाणार नाहीं म्हणजे? जावंच लागेल. मी–तुझा बाप सांगतों म्हणून. जा, नीघ. धर्म्या घेऊन जा हिला.'

आणि तेव्हां विजयनं आश्वासन दिलं, 'ते एकटे नाहींत. मी आहेच.'

'तुम्ही?' वासंतीच्या डोळ्यांत कृतज्ञता होती. 'खरंच!' त्या आवाजांत विनती होती.

'होय! जा तुम्ही. बायकांनीं असूं नये इथं. लोकं बघतात. उगाच विषय गांवांत!' त्यानं सांगितलं.

'नाहीं, नाहीं पोरा.' दाजीचा यालाही विरोध होताच, 'आमचा वाद. तुला नाहीं पडता येणार'

'अहो, पण ऐकून तरी घ्याल.'

'हा माझ्या तत्त्वाचा प्रश्न आहे. होय! सत्याचा आग्रह, अनिष्ट, हिंसक प्रवृत्तींविरुद्ध लढा.' दाजी नाटकी आवेशांत ओरडला.

'आणि मुर्दाडासारखा गंमत बघत बाजूला उभा राहूं-मी? नाहीं दाजी, माझ्यानं हें होणार नाहीं. माफ करा मला.' विजयनं निग्रहानं म्हटलं आणि वासंतीला उद्देशून सांगितलं, 'तुम्हीं व्हा पुढं! यांची काळजी करूं नका. ती जबाबदारी माझी.

वासंतीचा निरुपाय होता. जमावांत उभं रहाणं नाहीं तरी रास्त दिसलं नसतं. पाण्याचा तांब्या उचलून ती चालूं लागली.

आणि तसा धर्म्या रुद्रेही कोणाच्या तरी अंगावर ओरडला, 'नाटक चाललंय् रे? तें बघत उभा आहेस? चल, लाव हात ओझ्याला.'

म्हणजे त्यालासुद्धां आवेश चढला होता. त्याच तेजींत माथ्याला ओझं झेपत नव्हतं, पाय लटपट करीत होते. चार पावलं गेला तसाच हलकू हलकू करीत आणि मग आठवण झाली तसा शिरा ताणून ओरडला, 'दाजी, ताईबायना पोंचवून हा येतोंच आहे. काय? एकटा नाहीं, उभा आवाठा! एकदां भांचोद होऊन जाऊं दे! हां!'

आणि धर्म्या तणतणत नेटानं निघाला.

### ४

दाजी नाबराच्या ओटीवर एकदाचं सामान आदळलं आणि धर्म्या तडक धांवत सुटला. टेकलासुद्धां नाहीं. आतेबाईच्या चहाची आज धर्म्याला गोडी नव्हती. जीव द्यायला देखील सवड नव्हती तर!

रवळनाथाच्या देवळासमोर दीपमाळेच्या कठड्यावर उभा राहून धर्म्या रुद्रेनं बोंब ठोकली. बेंबीच्या देठापासून तो ओरडा करीत राहिला, 'खालांतल्या रुद्र्यांनू, वयलांतल्या कांबळ्यानूं, सड्यावयल्या देवळ्यानूं असाल तकडून धांवा हो! त्या रांडेच्या हुडेकऱ्यांनी आपल्या दाजी नाबराला धरला होऽ होऽऽ'

आवाठ्यांत चुकून कधीं वाघ निघाला अगर कोणाच्या घराला आग लागली तर हा असा बोभाटा करून गांव उठवीत. गांवकऱ्यांना कळावं, प्रसंगाला तीं धांवून यावींत म्हणून वहीवाट पडलेली. पण लोकं तीं विसरत चाललीं होतीं. असला प्रसंग नाहींतरी आजकाल येत होता कुठं म्हणा!

सरत्या चैतांतील ओढग्रस्त दिवस. मळभटीचें, कामगतीचे, घाम गाळण्याचे. सांजला सावल्या जाळ करीत, कडुसा थंडपणं धगत राही.

दिसाभरच्या वावरानं शिणलेलीं लोकं घरला परतत होतीं. कोणीं वर रानांतून उतरत होतीं. कोणीं खालीं माडांच्या बागांतून अन् वायंगणांतून हाशहुश करीत वर सरत होते. ज्यांना रोजगारधंदा नव्हता किंवा असला तरी दुसऱ्याकडून करून घेण्याची हिकमत आणि ऐपत होती अशीं लोकं पाय मोकळे करण्यासाठीं बाहेर पडलीं होतीं. ख्रिस्तावाच्या वाडींत बस्त्यावाकडे करटीभर सोरा आणि मग ओहोळावर रावल्या कृष्णाच्या खोपींत 'आण्याचीं बारा भजीं' असा कार्यक्रम झाल्याखेरीज दिवस गेला असं वाटतच नसे त्यांना.

आजउद्यांच्या तारेवर रोजच्यासारखं सांजपाखरूं अवशीचं विसावलं होतं.

तर अघटित वर्तलं!

धर्म्या रुद्रेची आकान्ताची बोंबाबोंब आवाठकरांच्या कानीं गेली. दाजी नाबराला धरल्याचं ऐकलं मात्र—आणि मग पुरतं ऐकायला थांबतो कोण? कारण नव्हतं. ऐकलं तेंच खूप होतं.

काळजालाच चरका बसावा असा जो तो चरकला, कचरला. दारूची नशा खाडकन् उतरली. भजाच्या प्लेटी आणि चकाव्या तशाच अर्धवट बाजूला पडल्या. बसल्या जागचीं वेडीवाकडीं उठून धडपडत लोकं उभीं राहिलीं. आतां पुढं? या प्रश्नार्थक चेहऱ्यानं तीं एकमेकांकडे बघूं लागलीं. शिडांत वारं भरावं तसा त्यांचा सात्विक संताप शिवशिवून आला.









कुदांचा बांबू झटक्यासरशीं हिसकून खालीं जमिनीवर आदळत राघल्या कृष्णा पुढं झाला. राक्षसपार्टीच्या खड्या आवाजांत ओरडला, अरे, जित्ता असेल तो येईल माझ्यामागं, बाकीच्यांनीं जावं घरला परत. असला नसला पराक्रम बायकोला दाखवावा. "

खरं म्हणजे असं बाकडं बोलण्याची जरुरी नव्हती. आवाठ्यांतील लोकं एकापेक्षां एक सगळीं ताठ होतीं, जिवन्त होतीं. मेल्या करीची मुर्दाड औलाद नव्हती. शिमग्याला रोमाट निघावं तसा गहजब आणि गजबज करीत राघल्या कृष्णाच्या मागं ते धांवले. लाठ्याकाठ्या, कोयते–कुऱ्हाडी वाटेंत घरीं जाऊन हाताला येईल तें एकेकानं उचलले. आणि ते खळनाथाच्या देवळाकडे निघाले. मोठमोठ्यानं हळी अन् कुकारी देत उभा आवाठा त्यांनीं दणाणून सोडला.

शें–दीडशें लोकांचा जमाव समोर बघून धर्म्या रुद्र्याला बरं वाटलं. त्याला संशय होता, शंका होती. लोकं येतील कीं नाहीं! लोकांच्या बोलण्यावरून त्यांच्या मनाचा तो अंदाज घेत होता. वेडा! त्याला ठाऊक नव्हतं. व्यवहाराचे ठोकताळे दाजी नाबराच्या बाबतींत लागू नाहींत. जोंपर्यंत माणसांत माणुसकी आहे तोपर्यंत दाजी नाबर एकटा नाहीं—कुठंही, कधींही एकटा पडणार नाहीं.

धर्म्याला तेंच अप्रूप झालं. तसा त्याला आणखीच जोर चढला. मोठ्या अवसानानं तो पुढं झाला. म्हणाला, " भांचोद! आज आपल्या दाजीला धरला. नेम नाहीं, खळनाथाच्या ह्या मूर्तीलाच हात घालतील. "

" तो हात शिल्लक राहील होय रे धर्म्या? कुऱ्हाडीनं टाकीन तोडून. हां! " कुणीसं सांगितलं.

" दाजीच्या केसाला तरी हात लावा म्हणावं— " दुसऱ्या एकानं तोंड घातलं. शरीराचा पुरा केस न् केस भादरून काढूं—वस्तऱ्यानं. "

धर्म्या रुद्रे तर मध्यें उभा राहून पुढाऱ्याच्या थाटांत बोलूं लागला, " दाजी नाबर म्हणजे काय तुमच्या आमच्यासारखा मातीमसणांतला माणूस आहे रे? त्याची लायकी काय? पुण्याई केव्हढी? कोण तपश्चर्या? त्याच्या वाटेला जायचं म्हणजे हें कसलं अवचिन्ह? थू: त्यांची! मायच्यांनू ही काय अक्कल झाली होय रे? "

जमावानं जाब दिला, ' अर्ध्या गाढवांची अक्कल ही! जाईल मसणांत—त्यांच्याच बरोबर! "

'पाटीला खाज सुटली की रिवाड महारवाड्यांत शिरतं म्हणतात.' धर्म्यानं दाखला दिला. आणि उजवा हात वर उचलून आवेशानं म्हटलं ' म्हणावं अरे पाठची खाज निवेल—बऱ्यापैकीं निवेल! केव्हा? टाळकीं फुटलीं, चार दोन माणसं जायबंदी झाली कीं–कीं मग! काय? '

पण लोकं उतावीळ झालीं होतीं. अस्वस्थ झालीं होतीं. त्यांना अधिक धीर धरवत नव्हता. घाई होती. या धर्म्याचं भाषण ऐकायला तीं धांवलीं नव्हतीं. दाजी नाबराला हुडेकऱ्यांच्या हातून सोडवायला निघालीं होतीं.

बरेच आवाज एकदम उठले, ' चला रे! निघू आतां. '

' होय, निघायचंच. ' धर्म्या रुद्रे रुबाबांत म्हणाला, ' पण आधीं देवाला सांगणं–बिगणं घालाल का कसं? का आपलं तसंच निघायचं.'

त्याची ही सूचना बरोबर होती. महत्त्वाची होती. जमावानं एकमुखानं तिला पाठिंबा दिला, ' हां हें बाकी खरं. '

आणि तसा धर्म्या शेफारला लोकं आपलं मुद्दां ऐकून घेतात ही गोष्ट आजच त्याच्या अनुभवास येत होती. त्याला मूठभर मांस चढलं. मिशावरून हात फिरवीत त्यानं म्हटलं, धर्म्याची प्रत्येक गोष्ट धर्माचीच असते. आतां तुम्ही कांहीं म्हणा? काय? आं– म्हणजे राघल्या कृष्णा वेताळासारखा दांडा आपटत मागं का रे बाबा तूं? ये, असा पुढं हो. हा नारळ फोड देवाला. ठोक गाऱ्हाणं घालून टाक. आवाठकरांच्या वतीनं सांगणं कर. '

राघल्या कृष्णा निमूट पुढं झाला. आंतल्याआंत आवाज घुमवीत सांगणं घालूं लागला, ' देवा खळनाथा, आवाठकरांच्या विघ्नहर्त्या— '

जमावानं साथ दिली. ' होय सायबा! '

' तुझ्या मायेला पार नाहीं, कृपेला अन्त नाहीं.

' होय सायबा! '

' तुझा लेक आणि आम्हा आवाठकरांचा थोरला भाऊ जो दाजी नाबर— '

' होय, होय सायबा! '

' त्याला हुडेकऱ्यांनीं विनाकारण, बळजबरीनं आणि सायबा दुष्ट बुद्धीनं धरला आहे. तरी त्यांना जल्माची याद राहील अशी अद्दल घडवून दाजीची सुखरूप सुटका करण्याकरितां तुझीं हीं लेकरं जात आहेत. त्यांना हिंमत, हिकमत आणि ताकद देऊन त्यांच्या कार्यांत यश मिळवून द्यावं हें एकच सांगणं सायबा आम्ही करीत आहोंत. '

' होय सायबा!' ' होय सायबा'च्या त्रिवार गजरांत राघल्या कृष्णानं दीपमाळेच्या पायरीवर धाडकन् नारळ फोडला.

इतक्यांत मागून खणखणीत आवाज आला, ' मारामारी, तंटाबखेडा वगैरे हिंसेचे मार्ग देवाला मंजूर नाहीत रे! राघो कृष्णा, कितीदा सांगायचं हें!'

दाजी नाबराचा हा आवाज जमावानं तेव्हांच ओळखला आणि आश्चर्यानं जो तो मागं बघूं लागला.

होय! तो दाजीच होता. आणि एकटा नाहीं, एक गोरटेला तरुण बरोबर होता. केव्हांपासून मागं, तिथं बाजूला देवळाच्या कठड्याला टेकून ते तसे चूपचाप उभे होते देवजाणे! जमावापैकीं एकाचंही लक्ष त्यांच्याकडे गेलं नव्हतं. लोकं होती घोरांत, या दाजीच्या काळजींत. देवाला सांगणं अन् सांकडं घालून बसलीं होतीं आणि ती गंमत बघत हे दोघे उभे होते.

' दाजी, अरे काळजींत आम्ही.' राघल्या कृष्णा म्हणाला, तेव्हां तुझी शिकवण लक्षांत नाहीं राहिली तर तो काय गुन्हा झाला रे?'

आणि मग पांचदहा लोकं एकदमच बोललीं. 'काळजी तुमचीच! दुसरी नाहीं. वाटलं, सोडतात कीं नाहीं.'

' म्हणून लाठ्या आणि कुऱ्हाडी घेऊन टाळकीं फोडणार होतां होय?' दाजीनं विचारलं.

'छां: छां:! तुमची सुटका झाली की मग आंगं कां लागेना मागं! आं! ' धर्म्यानं रुबाबांत म्हटलं,' 'म्हणजे बाकी कांहीं करतां येत नाहीं—ती योग्यताच नाहीं आमची म्हणा! म्हटलं निदान एवढं करावं काय?'

'तर प्रत्यक्ष तूंच हजर झालास!' राघल्या कृष्णा गहीवरून म्हणाला, दाजी, तुला मात्र वाटतं लोकं दुस्वास करतात तुझा.'

'नाहीं, राघो कृष्णा नाहीं!' दाजीनं त्याला मध्यंच तोडला, 'तो गाढवपणा-आतां-यापुढं तरी–' त्याला बोलायचं होतं. पण पुढं बोलवेनाच. आवाज भरून आला. आंवढा जड झाला. दोन्ही हात कपाळावर घेऊन दाजी मान हलवीत उभा राहिला.

एकाएकीं म्हाताऱ्याला काय झालं ते जमावाला कळेना. ते धांवले, लगबग पुढं झाले. दाजीला धरून त्यांनीं तिथंच कठड्याला टेकून बसता केला. धर्म्या उपरण्यानं वारा घालूं लागला. कुणीतरी पाणी आणायला धांवलं.

'मायच्यांनीं मारलं कीं काय रे दाजीला?' एकानं शंका घेतली.

'मुंबईच्या या पाहुण्यांना विचारा तें. त्यांनी मारे हमी दिली होती! 'धर्म्यानं विजयकडे बघत म्हटलं,' काय हो, काय झालं तें तरी सांगा!'

'कुठं काय, कांहीं झालं नाहीं. नुसतीच वाट पहात बसलों होतों झालं.' विजय हंसून म्हणाला, 'पण ज्याची वाट बघत होतों तें माणूस मात्र दुसऱ्याच वाटेनं पळालं होतं. तरीवर दाजी आपली वाट बघत उभे आहेत हें त्याला कसं कळलं कुणास ठाऊक!'

'हात् तेची! म्हणजे कांहीं झालंच नाहीं म्हणा कीं! भाऊ कुळकर्ण्याचा बार फुसका निघाला.' धर्म्या समाधानानं फुलून म्हणाला.

हें चाललं आहे तर देवळ्यांत अण्णागुरुजी थयथयाट घालीत आला. पोफळीच्या झाडासारखा उंच, ताठ आणि सडसडीत होता हा अण्णागुरुजी. वर पिकल्या केसाचं घरटं, पांढरी शुभ्र दाढी, वर्ण गोरापान. अंगावर मांस नव्हतंच, आणि जें होतं तें लोंबत होतं. गळ्यांत रुद्राक्षाची माळ त्यानं बाळगली होती. खालीं नुसताच पंचा होता. अण्णागुरुजी दिसे वृद्ध कपीसारखा पण त्याच्या चेहऱ्यावर कांहीं वेगळंच पाणी होतं. वाटावं–हा माणूस असातसा नाहीं. कांणी विशेष आहे.

पाऊल टाकतांच अण्णागुरुजीनं पहिली आरोळी ठोकली, "हा अण्णागुरुजी अद्याप जिवन्त असतां दाजी नाबराच्या वाटेला जाण्याची या दुनियेंत कोणाची माय व्याली आहे बघतोंच मी."

"अहो, जरा आस्ते, हळूं बोला. इथं याना त्रास होतोय." विजयनं सूचना दिली.

"अण्णागुरुजीला अस्तेकदम म्हणणारा तूं रे पामर कोण?"

"ते मुंबईचे साहेब अण्णा" धर्म्या बोलला.

"या देशाला स्वराज्य मिळून आठ वर्षं उलटलीं तरी साहेब नांवाचा प्राणी अद्याप जिवंत आहेच काय? धिःकार, धिःकार असो आम्हाला. कारण कीं गुलामगिरीचे हे भग्न अवशेष अजून आम्ही तोडूं शकत नाहीं," आणि अण्णागुरुजी भुंवया वाकड्या करून त्या मुंबईच्या पाहुण्याकडेच बघत राहिला.

"अरे अण्णा, तुझ्या कमळीचा लेक हा." दाजी नाबरानं आतां तोंड घातलं, म्हणजे अण्णागुरुजीचा आवाज ऐकला आणि तसं दाजीला गप्प बसवेना. गळा मोकळा झाला त्याचा. आवाज सुटला.

'कमळीचा? छाः! बिलकूल झूट! अशक्य!' अण्णागुरुजी शब्दागणिक आवाज चढवीत आणि चाळवीत ओरडला.



## 'न' व काव्य—

न गे नाकारितां, काव्य परिसात्रे।
व्यंजन विसावे, 'न' हे ऐसे ॥ १ ॥

'नस्ता' नालस्ती ही, खोड या जगाची।
दुनिया खऱ्याची, 'नाहीं' बापा ॥ २ ॥

न मधें दिसेही, प्रगती जगाची।
'न' घे जागा त्याची, जगीं कोणी ॥ ३ ॥

पुरुष कधींही, 'न' सांगे पगार।
सांगे 'ना' उमर, नारी तशी ॥ ४ ॥

बिगारी ते बी. ए. कधी ना नापास।
वधू परीक्षेस 'नापास' ही ॥ ५ ॥

पुलें आवर्जोनी, मिळे 'ना' का स्थळ!।
म्हणे वक्षःस्थळ, रिकामे हे ॥ ६ ॥

दिल्या वेळीं जरी, भेट 'ना' जहाली।
होई ती कहाली, प्रेमिकांची ॥ ७ ॥

'मिळेना' शोधोनी, जगीं स्त्री ही कोणी।
दागिन्या ठिकाणी, आस नाहीं ॥ ८ ॥

जगीं 'नाहीं' बाई, किती जरी घाई।
न बघतां जाई, आरशांत ॥ ९ ॥

उलथा पालथ, दुकानांची देख।
मनीं साडी एक, भरे 'ना' ती ॥ १० ॥

नकाराची नक्षी नागमोडी भारी।
बळ धरी नारी, 'नकारांत' ॥ ११ ॥

पहा ही कंकणें, 'नाहीं' सैल कधीं।
तुपा दुधा मधीं, जीव फार ॥ १२ ॥

'न' मागतां जरी, साय पडे पानीं।
नको शंका मनीं, धोका जाण ॥ १३ ॥

स्निग्ध लावे पोटीं, मागणी खुबीची।
नाही म्हणायैची, सोय 'नाही' ॥ १४ ॥

अनुक्रमणिका

नाटक तमाशी, ये 'ना' आमंत्रिता ।
'विना' आमंत्रिता, कीर्तनी ये ॥ १५ ॥

'न' धरी तमाही, भल्यांची ही देख ।
जांभई आणिक, डुकली ती ॥ १६ ॥

रात्र गेली वाया, 'न' पाही ढुंकून ।
दुष्ट वैऱ्याहून, झोंप ती ही ॥ १७ ॥

विनोद विनोद, बराशी ये फिट ।
बोले 'ना' अन्फीट, अगदींच ॥ १८ ॥

महा नैवेध तो, 'न' खात्या देवासी ।
पै जे हवे ज्यासी, ते 'न' मिळे ॥ १९ ॥

येणे मागुजातां, कभी 'ना' लेजाव ।
बोले कल आव, अभी 'नही' ॥ २० ॥

कधीं 'न' ये खरा, अंदाज तो पाही ।
खातें खास तेही, हवामान ॥ २१ ॥

पाण्यावीण ऐसे, 'ना' ज्याचें जीवन ।
पाणी मानी धन, गवळी हा ॥ २२ ॥

हवी तेव्हां जी ही, 'न' मिळे कधींही ।
अशी एक ती ही, रजा पाही ॥ २३ ॥

कधीं 'ना' घडे ही, ना करी हा कशा ।
चांभार चौकशा, शेजारी हा ॥ २४ ॥

स्वच्छता, स्वच्छता, वाचाळतो भला ।
'ना' दे बगलेला, बगल ही ॥ २५ ॥

नको तेथें वाटे, हवी तेथे 'ना'ही ।
अशी एक पाही, लाज ती ही ॥ २६ ॥

'न' ये आडविता, 'न' ये घडविता ।
जीवनाच्या फिता, अनुभव ॥ २७ ॥

अधांतरी ते हे, 'न' देती होकार ।
वा 'न' दे, नकार, तटस्थते ॥ २८ ॥

उघडी 'ना' डोळे, दिन एकवीस ।
ज्ञात हे जगांस, श्वान पिल्लू ॥ २९ ॥

जन्मांतरी 'ना' हे, उघडती डोळे, ।
पिल्लू हे आगळे, माणसाचें ॥ ३० ॥

—पंडित महाजन



राघल्या कृष्णानंहि त्याला दुजोरा दिला. सांगितलं, 'कमळी मेली. जीव दिला पोरीनं. उभं गांव हळहळलं होतं. पांचपंचवीस वर्षांपूर्वीची हकीकत.'

'होय !' दुसऱ्याहि एका म्हाताऱ्याला आठवण झाली. तो म्हणाला, 'पहिल्यासारखं आठवत नाहीं आतां. अण्णा तूं मिठाच्या चळवळींत पडलास आणि जेलांत गेलास. तर मागं हें असं झालं. जीव दिला का रानांत पांढऱ्यानं फुंकली. नक्की ठावठिकाणा लागलाच नाहीं. पण तुझी बहीण कमळी कुठं काय बेपत्ता झाली ती झालीच. गांवांत लोकं मात्र म्हणूं लागलीं......'

पण दाजीनं त्याला आवरलं. मध्यंच म्हणालं, 'झालं गेलं ! गंगेस मिळालं.' विजयला उद्देशून तो म्हणाला, 'विजय शिर्के आमच्या माहितीप्रमाणं गंगाराम गुणाजी रेडकर नांवाचा इसम एकच—हा.' आणि दाजीनं अण्णा गुरुजींकडे बोट दाखवलं.

'मी—मी नाहीं. मी अण्णागुरुजी.'

'अण्णा, अरे स्वतःलासुद्धा विसरलास रे ! काय हा तुझा अधःपात' दाजीनं चेष्टेनं म्हटलं.

तसा एकच हंशा पिकला.

अण्णागुरुजी बिघडला. एकदम त्याची तब्येत गरम झाली. 'भांचोद ! चूप बसतां का नाहीं ? हंसताहेत मला—अण्णागुरुजीला. एकेकाला होता का नव्हता करून सोडीन—हां ! आणि तूं रे, आई जिवन्त आहे म्हणून. एका शब्दानं तरी कळवायचं होतं.'

'तें तिलाच विचारायला हवं. पत्र लिहून आता विचारतोंच.' विजयनं उत्तर दिलं, 'पण आधीं घरीं तरी चला.'

'विचार, विचार हें तिला ! आणि हेंही कळव कीं गंगल्या देवळ्याला अण्णागुरुजी म्हणतात गांवांत आज. पण काय रे, कमळी बरी आहे ना—माझ्यासारखीच का कशी ?

'या गोष्टी आतां घरीं गेल्यावर कर अण्णा. खुशाल सवडीनं. पहिला या तुझ्या भाच्याला घरीं घेऊन जा.' राघल्या कृष्णानं जाणतेपणानं सुचवलं.

अण्णागुरुजीलाही तें पटलं. 'होय राघल्या, म्हणजे चुकलंच बघ माझं. अशासाठीं आलों होतों—दाजी, अरे हुडेकऱ्यांनीं धरला होता ना तुला ? धरोवर बोंब ऐकला आणि म्हणून धावत आलों. तूं तर समोरच आहेस. म्हणजे सगळं खोटंच दिसतं.'

'धम्याचे हे नसते एक एक उद्योग ! काय रे कोणी धरलं होतं भडव्या मला ?' दाजीनं धम्याला डाफरलं.

'नाहीं दाजी. माझा आपला तर्क. म्हटलं तयारींत असावं.' धम्यानं ओशाळून जाब दिला, 'आता रवळनाथाच्या कृपेनं निभावलं म्हणा.'

'होय ! आणि माझ्या महामायेच्या कृपेनं गांवांत कंपनी येतेय.' अण्णागुरुजी गर्दीकडे बघत एक एक शब्दावर जोर देत म्हणाला, 'अरे ऐकलंत का ? कंपनी येणार, कंपनी या गावात. आता पोटाची काळजी सोडा.'.

'होय कंपनी येते ? कितीक वर्षं चाललं आहे येणार येणार म्हणून.' लोकांनी त्याची बातमी उडवून लावली.

'पण आतां मी सांगतो आहे, हा अण्णागुरुजी ! काय बिशाद खोटं होईल ! कंपनी मोठी आहे—बड्या गुजराथ्याची. एकूण प्लान

कम्प्लीट आहे. सरकारनं परमीटसुद्धां दिलं. बघालच आतां आठवड्या-भरांत वर डोंगरावर धडाधड सरुंग उडूं लागतील. तुम्हाला मग कामच काम! कराल तेवढं थोडं! आणि मजुरी रोखठोक! तर सांगतो काय? बाबांनों, पर्वणी आली रे पर्वणी. तिच्यांत हात धुवून घ्या. चैन करा—गंमत आहे! माझ्या महामायेच्या कृपेनं बरे दिवस येताहेत गांवाला.' अण्णागुरुजी उत्साहानं सांगत होता.

"गाढव आहेस!" दाजी नाबरानं त्याला छेडलं. कां कोण जाणे त्याला मात्र या बाबतींत बिलकुल उत्साह नव्हता.

पण अण्णागुरुजी खचला नाहीं, उलट अधिकच अवसानांत आला. म्हणाला, "दाजी, सोन्यानं पैसा ओढशील आतां. तीं कलमं-बिलम राहूं देत तुझी! कांहीं अर्थ नाहीं. अरे, तुझ्या त्या डोंगराला सोन्याचा भाव येणार आहे. काय मागशील तो पैसा! आणि वर पाया पडतील."

उद्वेगानं हात उडवीत दाजी ओरडला, "हें होणं नाहीं. तुझ्या या कवनीला जमीन मिळणार नाहीं माझी. माझ्या भीम्माचं मी भस्म होऊं देणार नाहीं. कधींहि नाहीं—मेलों तरी बेहत्तर!"

आणि दाजी नाबर असंच कांहीतरी बडबडत सुटला. करडे डोळे फिरवून आणि हातवारे करीत बोलत राहिला.

●●●

## पांचालीचे केस

पान १३ वरून

संपला नव्हता. प्राक्तनांत वरंच कांहीं वाढून ठेवलं होतं तें मला भोगायचं होतं.

"वयाच्या सोळा–सतराव्या वर्षी मी साठ्यांच्या घरांत पडले. आई–वडिलांजवळ स्वच्छ सांगून मी लग्नाचा आग्रह धरला. मला पसंत म्हणून बाबांनीं स्थळ पसंत केलं आणि ते साठ्यांच्या दारांत गेले. एकुलत्या एक लेकीच्या आग्रहासाठीं एका सव्याफाटिंग कारकुनाला मुलगी देऊन मोकळे झाले. अखेरी-पर्यंत त्यांच्या हृदयांतील हें शल्य नाहींसं झालं नव्हतं. बाबांच्या मागोमाग वर्षभरांतच आईहि गेली."

बाई एकसारखं बोलत होती. माझ्या हुंका-काराची तिला गरज लागली नव्हती. स्वतःचा जीवनपट स्वतःच वाचीत होती. समोर कोणी बसलं आहे आणि त्याला हें नीट समजलें पाहिजे वगैरे भान तिला राहिलं नव्हतं. कैफियतीनें स्वगत लयींत आलं होतं. मी ऐकत होतों.

'गोखल्यांच्या उपकारामुळें मी भारावून गेले आणि त्यांना माझ्याशीं लग्न करावयास लावलं. हृषिकेशांना विवाहाचं बंधन नको होतं. मी तशीच बधेना म्हणून नाइलाजानें ते लग्नाला तयार झाले.

'बाराबा तो पुरुष या ना त्या कारणानं निकालस्त निघाला. पण फारकतीनंतर मला कधींच फार दिवस वाईट वाटलं नाहीं. गोखल्यांपासून काय किंवा हृषिकेशांपासून काय नातं तोडून मोकळं होतांना मला जड गेलं नाहीं. त्यानंतर कांहीं वर्षे मी अज्ञानांत–वैरा-ग्यांत घालविली. कुठलंहि कॉंट्रॅक्ट मी केलं नाहीं कीं कुठलीहि भूमिका पत्करली नाहीं.

"पुन्हा मी नाटकांच्या फंदांत पडलें तें दात्यांमुळं. नट, नाटक, नाटककार आणि रंग-भूमीचं पुनरुज्जीवन वगैरे गोष्टींचं दात्यांइतकं वेड असलेला दुसरा मनुष्य मी अजून पाहिला नाहीं. अक्षरशः हजारों रुपये दात्यांनीं त्या नादापायीं दवडले आहेत. चांगले नट तयार व्हावेत, नाट्यकलेला प्रतिष्ठा प्राप्त व्हावी, नाटक कंपन्या नीट फायदेशीर चालाव्यात, चांगल्या नाटककारांना वाव मिळावा यासाठीं त्यांनीं किती योजना आंखल्या, किती मेहनत घेतली हें त्यांचं त्यांनाच माहीत. मी पुन्हां नाटकांत कामं करावींत यासाठीं त्यांनीं फार प्रयत्न केले. मी कामं चांगलीं करतें हें दात्यांना मान्य होतं, पण मी जर भूमिकांशीं खरोखर समरस होऊन कामं केलीं तर तीं अधिक चांगलीं होतील असें दाते पहिल्याच भेटींत म्हणाले.

'मला खरं समजणारा एक नाट्यप्रेमी भेटला असं मला वाटलं आणि मी दात्यांच्या कंपनींत येऊन दाखल झाले. आणि पुन्हां निरनिराळ्या भूमिका करूं लागलें.

'माझ्या पुढं पुढं केलेलं मला आवडत नसे. पुरुषानं स्त्रीपुढं लचाळपणा करावा हें मला मान्य नाहीं. आपल्या या नाटक–सिनेमाच्या व्यवसायांत मला तसे अनु-भव खूप आले आहेत. मी अनेकांना खेटारल्याचंहि तुम्ही ऐकलं असेल, पण दात्यांचं स्त्रीदाक्षिण्य मला आवडे. त्यांत लवळपणा नसे. पण त्यांची स्त्रियांशीं वागणूक फार मुलायम असे.

'घरांत सून आणावी आणि आजी होऊन नातवंड खेळवावं अशा वयांत मी दात्यांच्या आग्रहाला बळी पडले. आणि पुन्हां लग्न केलं. नवा संसार मांडला.

'यापूर्वीचीं लग्न करतांना मला प्रत्येक वेळीं कसली तरी धुंदी होती. पहिल्या वेळीं तारुण्याची, गोखल्यांच्या वेळीं कृतज्ञतेची. तर तिसऱ्यावेळीं कीर्तीची. पण यावेळीं मी माझ्यासाठीं लग्न केलं नाहीं. दात्यांनीं मला तें करण्यास भाग पाडलं. मी लग्न केलं खरं, पण मनांतून सारखी हुरहूर वाटे. सारखं वाटे, दात्यांनीं स्वतःजोगती स्त्री पहावी आणि तिच्याशीं लग्न करून सुखी व्हावं; माझ्या फंदांत पडूं नये. मी चाळीशी उलटलेली. दाते सारे अठ्ठावीस वर्षांचे. हातीं पायीं पडून डोळ्यांत पाणी आणून मी दात्यांची समजूत घालून पाहिली. पण त्यांनीं ऐकलं नाहीं. त्यांच्याशीं अबोला धरून पाहिला. त्यांना टाळण्याचा प्रयत्न करून पाहिला. खोटं भांडण करून बाहेरगांवी जाऊन राहिले पण उपयोग झाला नाहीं.

'लाज वाटते उच्चारायला पण सांगतें. मीहून त्यांना तसली सोबत देऊं केली, पण त्यांनीं ती साफ नाकारली. त्यांना माझ्याशीं विवाहच करायचा होता. माझ्याबरोबर काय-मचा संसार थाटायचा होता. खुळा बिचारा! कसलाच अनुभव नव्हता, कशानं भारावून गेला होता कोण जाणें! पण एक दिवस म्हणाला, 'माझ्याशीं लग्न केलं नाहींत तर माझं सर्वस्व उध्वस्त होईल.' फार मानायचा मला. लग्न झाल्यावर सुद्धां 'अहो जाहो' करायचा कितीक दिवस.

'मलाहि वाटलं लग्न केलं तर दात्यांना सांभाळतां येईल. रंगभूमीच्या वेडापायीं त्यांनीं स्वतःची चालविलेली खाण्यापिण्याची आबाळ थोपवितां येईल. त्यांनीं चालविलेली संपत्तीची उधळमाधळ थोपवितां येईल. त्यांना तसं कोणीच नव्हतं...माझ्या मनांत आशा अंकुरली.

'एक दिवस असेच आम्हीं दोघं मुंबईला चाललों होतों. बसमधून बरोबर होतों, असेच गाडींत बसलों होतों. मला म्हणाले होते, 'तुमचे केस किती छान आहेत. तुम्ही खोटं सांगतां. तुमचं वय चाळीस असणं शक्य नाहीं. फार तर तीस वर्षांच्या असाल!' माझ्या केसांचं फार कौतुक होतं त्यांना.

...पान ५८ वर









देशाच्या भरभराटी करितां रेल्वेंना अति महत्वाचें काम करावयाचें आहे. देशाच्या रक्षणा करितां आज तर त्यांचे वर अधिकच जबाबदारी येऊन पडली आहे.





मध्य आणि पश्चिम रेल्वे

**भारताच्या संरक्षणासाठीं आपल्या रक्ताची, श्रमाची आणि धनाची (सोन्याची) अत्यन्त जरूरी आहे–तें अविलंब द्या**





अनुक्रमणिका




दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

—संपादक

## चक्राकार फिरणारी अकर्म कहाणी—

'रथचक्र' ही श्री. ना. पेंडसे यांची सहावी कादंबरी. पेंडसे एक सिद्धहस्त कादंबरीकार आहेत हें सिद्ध करणारी. संपूर्ण कादंबरी वाचून झाल्यावर मनाशीं प्रश्न येतो... 'रथचक्र' या नांवानें पेंडशांना काय सुचवावयाचें आहे ! किंवा त्यांच्या मित्रांना श्री. गानूंना !—हा रथ कोणता ? हें चक्र कोणतं ? धरणीकडून गिळलं जाणारं कां ? कथानकाची गति रथचक्रासारखीच धीमी धीमी व जड जड वाटतें. पण गतिमानता कुठेंच खंडित होत नाहीं. कादंबरीच्या नायिकेला येणारा प्रत्येक कड पकड घेतच जातो. हें केवढें मोठें यश पेंडशांचें ! उत्तर रत्नागिरींतील एका विशिष्ट परिसरांतील एका विशिष्ट कोंकणस्थ कुटुंबाची ही कहाणी. आजवरच्या पेंडशांच्या कथा ज्यांनीं वाचल्यात त्यांना या कादंबरींतील प्रमुख परिसर व प्रसंगस्थळें अगदींच अपरिचित वाटण्याचें कारण पडूं नये. ही सुद्धां कादंबरी पेंडशांच्या प्रादेशिकतेचाच वाढलेला पसारा. पेंडशांनीं प्रारंभापासून अखेरपर्यंत एक बूज कटाक्षानें पाळलेली आहे. तंत्राची. तंत्राचा ताळ त्यांनीं कुठेंच सोडलेला नाहीं...तिला घर मिळालं तें दीरा—जावांनीं भरलेलं. थोरला दीर 'लखनौ' वाला. नवरा 'संसाराला विटलेला;' पण तिच्या पदरीं चार मुलें घालून गेलेला. प्रारंभींच तो आपल्याला भेटतो. पहिलंच वाक्य कादंबरीकारानं त्यालाच उद्देशून लिहिलं आहे...' आणि अचानक तो नाहीसा झाला...' दोष मात्र सारा तिचाच ! दहा वर्षें झालेलीं असतात. त्याचं पलायन काल घडावं इतकं ताज तिला वाटत असतं. इथेंच तिच्या कर्मकहाणीचीं रथचक्रें करकरत फिरू लागतात. तिच्या थोरल्या मुलाचं शिक्षण थांबतं. बिचारा पोरका म्हणून घरांत कौतुक. दहाव्या वर्षापर्यंत शाळेंत जाईना. एकदां तिनं आडवा उभा बडवून काढला. शेवटीं नापास होत चौथ्या इयत्तेपर्यंत गेला. पण तोच 'साल्ये' म्हणून तिच्यावर ओरडला. त्याचे दळभद्री चाळे सुरू झाले. त्याचा जन्म वाया जाणार हें ती हेरते.

दुसरा मुलगाही वाया गेला असता. एकदा तिला फसवून त्यानें शाळा चुकवली. निगडीच्या काठीनं त्याला ती बडवून काढते. थोरली मध्यें पडते. रात्रीं त्याला ताप भरतो. पण ती ढुंकूनहि पहात नाहीं. 'वेळ पडली तर उद्यासुद्धां !" हा निश्चय करून झोपते. तिच्या घराचं आणि शिक्षणाचं वाकडं—लखनौला दीर लहानपणीं बाहेर पडला. वार लावून शिकला. मोठा झाला. तरी पण शिक्षणाचं महत्त्व कुणालाच पटत नव्हत. लखनौवाला एखाद्या पुतण्याला शिकविण्याच्या गोष्टी करी. पण त्याला प्रतिसाद मिळत नसे. त्याच्या पैशाला यश नव्हतं म्हणून तिला शिक्षणाचं महत्त्व पटे. पण जाऊकडून तिची थट्टा होई. सुदैवानं तिचा दुसरा मुलगा हुशार निघाला. सगळ्या तालुक्यांत त्याची हुषारी गाजते. आपल्यावरील आपत्तींचं निवारण होऊन अखेरीस आपण तालुक्याच्या गांवीं निश्चित जाणार असं आपलं तिला वाटे. मुलगा फायनलला गेलेला. त्याचवेळीं तिच्या नवऱ्याचा शोध लागतो. नवरा परतला घरीं तर !...लखनौवाला दीर येऊन थडकतो. काका तिला धीर देतात. तो 'लखनौवाल्याला मागे टाकील...' 'त्यालाच तिकडे ( लखनौवाल्याकडे ) नेलं कीं झालं...' तिला तेवढंच बरं वाटतं. तिनं थोरल्या दिराला प्रथम पाहिलं तो तिच्या आयुष्यांतील एक अनुभव होता. त्यानंतर तीन वर्षांनीं तो गांवाला आला. तेव्हा थोरला सहा महिन्याचा. त्यानें ढुंकूनहि तिच्याकडे, तिच्या मुलाकडे पाहिलं नाहीं. 'पैसा मिळवायची अक्कल नाहीं आणि लग्न लावून दिलंत. पोरं व्हायचीं थांबणारेत ?...' हे त्याचे उद्गार तिची झोप मोडतात. दुसऱ्याच्या जिवावर किती काळ जगायचं हा प्रश्न तिला छळतो. दीर तऱ्हेवाईक पण शहाणा असं तिचं मत होतं.

लखनौवाला अखेरीस सगळं भावांच्या मनासारखं करी. धाकटा मुलगा तिच्या बरोबर सारं ऐकत होता...तो म्हणतो तिला, 'मी लखनौला जाणार नाहीं. सांगून ठेवतोय—'

या दिराचा आदर्श त्यानं आपल्यासमोर ठेवावा ही तिची तळमळ. पण सोळा वर्षांचा झाला तरी तिला तो अगम्य राहिला होता. मोकळ्या मनानं कधीं बोलला नाहीं. घरांत कुणाला त्याचं कौतुक नव्हतं अन् तिच्या कौतुकाची तो कुठें कदर करीत होता ? लखनौच्या दिराप्रमाणं त्याचेहि आपल्याविषयीं विपरीत ग्रह झाले नाहींत ना ही शंका तिला त्याच्या शेजारीं अपराध्यासारखी बसविते. मग तिला मागचं सारं आठवतं. पुढचे बेत पण ती करूं लागते. धाकटा फायनलला पहिला येतो. त्याला 'मॅट्रिक' करायचं हा तिचा निर्धार ठाम होतो. दीरा—जावांची पर्वा न करतां ती तालुक्याला येते. रत्नागिरी शहरांतील एका आळींत मुलाला व मुलींना सोबत घेऊन जीवनाची लढाई खेळतें. तिचं सगळं आयुष्य हीच एक लढाई. वेगवेगळ्या आघाडीवर खेळली जाणारी. एका कोंकणस्थ कुटुंबांतील नैष्कर्म्याविरुद्ध बंड करणारी ही 'रथचक्रा'ची नायि[illegible] साकार अन् सजीव करतांना पेंडशांचं का[illegible] कारा[illegible] सामर्थ्य जणूं पणाला लागलं आहे [illegible] असं जाणवत राहतं.

—

प्रादेशिकतेचा फक्त स्पर्श या कादंबरीला झालेला आहे एवढेंच. पेंडशांच्या इतर कादंबऱ्यांप्रमाणें ही प्रादेशिकता कादंबरींतील एक पात्र बनून येत नाहीं. या कथेंतील प्रमुख पात्र म्हणजे 'ती.' कुठेंहि नांवाचा उल्लेख न करतां तृतीय पुरुषी सर्वनामांत गोवलेली तिच्या जीवनाची ही गाथा ह्या पेंडशांनीं मराठी कादंबऱ्यांत आणलेला एक आगळा प्रवाह. तो त्यांना चपखल साधला पण तिच्या जीवनाच्या तीन तऱ्हा शेवटीं तिच्या दोन मुलांकडून अपरिहार्यतेनें घडून येतात.... तिच्या हाताच्या शिराच उफराव्या...' असं पाप तरी माझ्या हातून काय घडलं तर अशीं दुःख माझ्या वाट्याला आलीं....' हे तिचे अखेरचे तळतळून काढलेलें उद्गार आंतडी चिरीत जातात आणि तिच्या शोकांतिकेच्या प्रारंभाला दुर्दैव तिच्या पाठीं हात धुवून लागतं तें अखेरपर्यंत तिचा पिच्छा पुरवतं...हीच तिची कहाणी!

इतर पात्रें तिच्या भोंवतीं चक्राकार फिरतच असतात. त्यांत 'थोरली' चटका लावून जाते. काकांची व्यक्तिरेखा कुठेंतरी कारुण्य कोरीत बसते. कृष्णाताईचं आगमन अशुभ मानायचं कां?...अश्लील?...अवास्तव? ...तसाच तो नरवणकर?...तिच्यावर 'शुद्ध' होण्याची पाळी आणणारा?...तिच्या दुर्दैवाच्या दशावताराला कुणी कुणाला जबाबदार धरावं? ...तिचे धाकटे दीर व जावा कां?...कीं तीच स्वतः?...तिच्या मुलानेंच तिला शेवटीं असं लिहिणं बरं होतं कां?'...पण तूं मृगजळाच्या मागें लागूं नयेस म्हणून स्पष्ट लिहीत आहे... माझ्या पाठीशीं उभी रहाशील ह्या आशेवर मी होतों. तूं दगा दिलास...' शेवटीं तिच्या तपाला अन् तापाला हेंच फळ कां?...

पेंडशांनीं कोंकणस्थांच्या कुटुंबसंस्थेवर एक नवा प्रकाश पाडून पुनंच दृष्य नाट्यमयतेनं दाखविलं आहे. हरिभाऊंनीं तेव्हां जें उद्दिष्ट समोर ठेवून सदाशिवपेठीं जीवन कादंबऱ्यांतून धारेवर धरलं तेंच जीवन इथें सुद्धां पुनःप्रत्ययाला आणून देण्याचं कार्य पेंडसे पुनः करीत असावेत असं वाटतं. कोंकणस्थांचा तोच कर्मठपणा, तोच कडवा करारीपणा, रुढीवाद अन् क्षुद्र जीवघेणा व्यवहार वाद 'रथचक्रां'च्या पानापानांतून प्रतीत होतो. अजूनही रत्नागिरीच्या परिसरांत कोंकणस्थांच्या मनोवृत्ति त्या जुनाट मनोभूमिकेंतच रुजतात व कुजतात. या वास्तवतेवर पेंडशांनीं या कादंबरींतून अचूक बोट ठेवलेलं आहे. पेंडशांचा प्रभाव तिथें जाणवतो. पण कौटुंबिक जीवनांतील चाकोरी चुकून सुद्धां चाकें बदलीत नाहीं. तिच्या पहिल्या मुलानं बापाचीच असहाय्यता स्वीकारलेली असते...सुनेला उद्देशून ती म्हणते... 'माझी गादी चालवायला आलीस. आतां मला मोकळीक झाली...' तिची मोकळीक होते खरी; पण सुटका कोणाचीच होत नाहीं. दुष्टतेच्या रथाला दुर्दैवाचीं चक्रें जोडलेलीं. तीं चक्रें तिला चिरडून टाकतात. तिचा शेवट होतो. पण कथेचा 'रथ' वास्तवतेचीं चक्रें लावून चालूंच रहातो. कहाणी संपते. कथा चालूच रहाते.

तिची ही कथा वाचकाचं मन व्यापीत जाते, कापीत जाते, पण हें सारं विलक्षण तटस्थपणानं घडतं. क्षणाक्षणाला असं वाटतंच राहातं कीं कादंबरीकार कटाक्षानं कथेंतून स्वतः निसटूं पहातो. कलात्मक अलिप्ततेचा स्वतःला विसर पडूं नये म्हणून कुठेंतरी त्याची कठोर धडपड अंतर्यामीं सारखी चाललेली जाणवते. स्थिरचित्रण खरंच. त्यांतील प्रत्येक व्यक्तीरेखा आखीव, रेखीव, चित्रमय!...पण कधीं भावनेचा बांध बेबंध उफाळला आहे आणि उसळी मारून शरीर थरारून सोडतो आहे व चित्त व्याकुळ व रक्तबंबाळ करून सोडतो आहे असं होत नाहीं. इथेंच पेंडसे आणि डोस्टोयव्हस्की यांच्यांतला मूलभूत विरोध जाणवतो. पेंडसे 'मॅड' होत नाहींत. डोकं ठिकाणावर ठेवतात. दोन खांद्यावर ते नीट पेलतात, मग तीव्र तटस्थतेनं आखून, माखून व जोखून लिहायला बसतात. व्यक्तिगत मनांतील अंतर्गत द्वंद्व ते निष्णात शस्त्रक्रिया तज्ज्ञांच्या शास्त्रीय संपूर्णपणें व भाव(अ)स्पर्शतेनें नीट न्याहाळतात. मग तंत्रज्ञतेनें त्यांचं रेखाटन करतात. 'स्व' ला बाजूला सारून. म्हणूनच 'रथचक्र' एका महान कलाकृतीची गर्भचिन्हें धारण करून डोळ्यांसमोर सरकत राहातं आणि पुनःपुनः आगतिक होऊन कठोर वस्तुनिष्ठता तेवढींच साधतें. कुठेंतरी करुण कोमल आत्मनिष्ठतेला पेंडसे पारखे होतात आणि प्रभाव पाडूनही महान कलासिद्धीचं कर्तृत्व गमावून निवृत्त होतात.

पण म्हणून 'रथचक्र' ही केवळ सामान्य व अयशस्वी कलाकृति थोडीच ठरते? एका पट्टीच्या प्रतिभावंतानें कलानिर्मितीच्या शब्दब्रह्मांत मारलेली ही गरुडभरारी उद्यांच्या त्यांच्या 'अमृत कुंभा' च्या सिद्धीची चुणूक समर्थततेनें दाखविते हें अनुभवण्यासाठीं तरी चोखंदळ रसिकांनीं ही कादंबरी निदान एकदां तरी निष्ठेनें वाचलीच पाहिजे.

(रथचक्रः— कादंबरी—लेः—श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४.)

—प्र श्री. नेरुरकर

## जिवाला दुखविणारे मायेचे रावे

'दररोजचा दिवस एखाद्या गिधाडाप्रमाणें पंख पसरून यावा आणि आयुष्याचा एक लचका तोडून निघून जावा असलें जीवन तो जंगत होता.' हें खरें म्हणजे जी. ए. कुलकर्णी ह्यांचा 'हिरवे रावे' ह्या नव्याकोऱ्या संग्रहातील पहिल्याच कथेंतील वाक्य आहे. पण हें सार्वकालिक सत्य आहे. सामान्यांच्या आयुष्याची सारी शोककहाणीच त्या वाक्यानें उघड केली आहे. 'हिरवे रावे' मधील कथांचा दुःख हा चिरंतन स्थायिभाव आहे. ठणकणारें गळूं टचकन फोडावें इतक्या तीव्रतेनें ते जीवनांतील दुःखाला हात घालतात. कारण हें मानवी आयुष्याचें दुःख मानवापेक्षाही चिरंतन आहे. अतिशय गुंतागुंतीचे आणि अनेक पदरी आहे. त्यामुळें बारीकसारीक घटनांची विलक्षण गुंतवळ कुळकर्णी निर्माण करतात. वर्णनांत विस्तार येतो आणि मग निवेदनालाच प्रतिमेचें स्वरूप यावें इतक्या प्रभावी रीतीनें बंदिस्त प्रत्ययकारिता निर्माण होते.

गाडगीळ, गोखले आणि भावे ह्यांनीं मराठी कथेला नवा आशय दिला. तोच ज्यांनीं प्रभावीपणें टिकवून त्यालाहि नवा आकार दिला त्यांत जी. ए. कुलकर्णी प्रामुख्यानें आहेत. गाडगिळांच्या कथेंतील प्रत्ययकारिता त्यांच्या कथेंतून व्यक्त होतांना दिसते.

कुलकर्णी ह्यांचा लिखाणाचा विशेष म्हणजे त्यांना माणसाबद्दल अपरंपार प्रेम आहे. प्रगाढ सहानुभूति आहे. अत्यंत आस्थेनें ते आपल्या व्यक्तींना शब्दाकार देतात आणि ह्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे त्यांच्या कथेंतील व्यक्ति भारून. नव्हे झपाटून टाकतात. अनुभव आत्मसात करण्याची लकबच विलक्षण आहे. जें दुःख ते कथांतून मांडतात त्याचा कधींच सांचा बनलेला दिसत नाहीं. तें सदोदित नवें वाटतें. भळभळत्या जखमेप्रमाणें जिवंत वाटतें कारण तें अनेक पदरी असतें आणि म्हणूनच जी. ए. कुलकर्णी ह्यांच्या कथेंतील निवेदनें मोठीं असतात. त्यांना सूक्ष्मतेची धार चढते आणि जी. ए. ना. व्यक्ति जशी उभी करायची असते तशीच ते उभी करूं शकतात.

'गिधाडें' मधील बापू काळुस्कर, 'पारधी'तले दादासाहेब, 'मुनी'तील सुमी आणि मी, 'शिक्षा'मधील शोभा, 'बाधा' कथेंतील रमा, 'राक्षस' कथेंतील शंकर सोनार आणि गुणी, 'अखेरचा दिवस'मधले नानासाहेब व दुसऱ्याचा गर्भ पोटांत घेऊन पुन्हा त्यांना लुबाडणारी व प्राण हरण करणारी, त्यांची पत्नी सावित्री, 'स्लीला'तील निपुत्रिक जोडपें, 'तक्षक' कथेंतील अण्णाराव, 'वहाणा'तला प्रवासी, अखेरच्या 'माणूस नांवाच्या बेटा'-मधील दत्तू जोशी आणि त्याआधींचा सुब्रान ह्या व्यक्ति जिवंत आहेत. त्यांच्या भोंवताली अनेक माणसें वावरत आहेत. त्यांच्यावर परिणाम करीत आहेत. त्यांची ठेवण वेगळी, स्वभावधर्म वेगळे आणि स्थिति व परिसरहि वेगळा आहे. पण तरी त्या सगळ्या व्यक्ति ओळखीच्या वाटतात. कुठें ना कुठें, कुणाच्या दुर्दैवफेऱ्यांत, कुणाच्या बेछूट कलंदरीपणांत तर कुणाच्या आकृतींत त्या भेटतात. त्यांची अगतिकता आणि अपरिहार्य अगतिकतेंतील शोकात खिळवून ठेवतो.

व्यक्तिचित्रण हा जी. ए. च्या लेखनशैलीचा एक विशेष अविष्कार आहे. सगळ्या व्यक्ति जिवंत रंगविणें हें त्यांचें सामर्थ्य आहे. 'पारधी' कथेंत जन्मठेपेची शिक्षा झालेला यल्लूभीमा त्यांनीं कातड्याच्या चिंध्याचिंध्यांनी शिवल्याप्रमाणें अगदीं फाटक्या अंगाचा आणि चेहऱ्यावर खुळ्या वासराची कळा असलेला, अशा एका फटकाऱ्यांत उभा केला तर 'बाधा'तील 'रमा' आयुष्य हातून निसटूं लागतांना डोळयांत येणारा भाबडा विसराळूपणा घेऊन उभी राहते. त्याच कथेंतील रमाकाकू तोंडाळ गोचिडीप्रमाणें चावरी दिसते. आणि 'माणूस नांवाचे बेटा'मधला दत्तु जोशी ह्या सगळ्या व्यक्ति विसरताच येत नाहींत.

जी. ए. कुलकर्णी प्रतिमांचा वापर अगदीं चपखल करतात. त्यांच्या शब्दांना त्यायोगे मोठा परिसर काबीज करता येतो. त्यांच्या वेंचकतेनें व्यक्तिचित्रणास उठाव मिळतो.

नुसते डोळे मोठें केलें असें न म्हणता रेनकोटच्या बटणाएवढें डोळे, असें ते म्हणतांत.

जिरॅनियमच्या फांद्यांना हत्तीरोग झाल्याची पुष्टता दिसते. जीव चार भिंतींच्या बादलीत जगतो. चारमिनार सिगारेटचा झुरका म्हणजे बबारणीच्या आडदांड रासवट आलिंगनाची आठवण करून देतो. नाइलाजानें केलेलें हास्य हें वाटीभर पेजेसारखें असतें. 'स्लीला' मधील भाऊमामांना निपुत्रिक जीवन हें 'आंधळ्या दिवसाच्या चिंध्या आयुष्यावरून एकेक सोडून टाकून शेवटीं त्याचा भलभलीत पाढरा कंद उकिरड्यावर फेकून देऊन चालूं लागायचे!' असें वाटतें. गोडाऊनची बकाल कळा असणारा शाळेंतील दत्तू जोशी 'सतत नासकं फळ खात राहिल्याप्रमाणें शिसारत' असतो.

मानवी आयुष्यांतील पराभव हेंच दुःखाचें महाकारण आहे कां? कसा? केव्हां आणि कुठें? ह्या चार प्रश्नांचीं उत्तरें शोधता शोधतांच आयुष्य विझून जातें. आणि तरीहि ह्या विना उत्तराच्या, म्हाताऱ्या वांझोट्या प्रश्नांचा जनानखाना मागे उरतो. 'माणूस नांवाचें बेटा' ह्या कथेंतील एक उतारा कुलकर्णी ह्याच्या सामर्थ्याची ग्वाही देईल. त्याच्या कथेंतील दुःखाची वेगळी प्रत आणि माणसाविषयीं प्रगाढ सहानुभूति व्यक्त करूं शकेल.

'एकजण तारुण्यांतील एका आठवणीवर आयुष्याला धार लावीत बसतो तर दुसरा चौदाव्या दिवशीं बोहोल्यावर चढतो. माल कंसाचा भव्य विस्तार, मोटारीखालची किंकाळी, बाळंत होत असतांनाचा आक्रोश, विमान हल्ल्याचा मन फाडणारा आवाज, चुंबनाचें चुटुक संगीत, प्रेत बाहेर नेत असतानाची कालवाकालव...' साऱ्या ह्या माणसाच्या अवस्था स्थित्यंतरें हेंच त्यांच्या कथाचें यश आहे.

जी. ए. कुलकर्णी संग्रहाला नाव देतात तेव्हां त्या नांवाची कथाच नसते. निळासावळा, पारवा किंवा 'हिरवे रावे' कोणतीहि. हेंहि त्यांच्या कथांचें एक वेगळेपणच म्हणता येईल. जिवाला दुखवून मायेचा 'हिरवा रावा' दूर उडतो आणि जी. ए. कुलकर्णी गांभिर्यानें त्याची दखल घेतात.

(**हिरवे रावे:**—लेखक—जी. ए. कुलकर्णी, पाप्युलर प्रकाशन, मुंबई. किंमत ६ रु., पृष्ठें २४८.)

—**केशव मेश्राम**

## एक पौराणिक कादंबरी

महाभारतांतील कर्णाच्या जीवन चरित्रावर आधारित ही कादंबरी सुप्रसिद्ध लेखक श्री. गो. नी. दांडेकर यांनीं लिहिलेली असून ती त्यांच्या आतापर्यंतच्या रामायण, महाभारत या सुंदर पुस्तकांप्रमाणेंच सुरस आहे. सर्वसाधारण वाचकांना ज्ञात असलेली कर्णकथा पाल्हाळीक पण रसाळ भाषेंत त्यांनीं या कादंबरींतून कथन

अनुक्रमणिका






केली आहे. त्यामुळें ही २५६ पानी कादंबरी एकदोन बैठकींतच वाचून संपवाविशीं वाटते. कादंबरींतील कर्णाचा जन्म, सूताकडील बालपण, कवच कुंडलें, परशुरामाकडून शिक्षण, अर्जुनाशीं लढण्यापूर्वी कांहीं काळ अगोदर कृष्ण व कुंतीनें जन्माचें रहस्य उलगडून त्याचा केलेला अपमान इ. कथाभाग चित्ताकर्षक आहे लेखकाला उदार नि पराक्रमी अशा कर्णाविषयीं खूपच सहानुभूती वाटते आणि म्हणूनच कीं काय कादंबरीचें नांव 'कर्णायन' हें ठेविलें गेलें आहे. पुस्तकांत कर्णाचें स्वभाववैशिष्ट्य उत्कटतेनें रेखाटण्यांत लेखकानें आपल्या लेखणीची कुशलता प्रगट केली आहे. कांहीं संस्कृत शब्दांचा नि वाक्यांचा पुस्तकांत विपुल भरणा आहे त्यांचा अर्थ जर स्वच्छपणें दिला असता तर वाचकांची आणखीन सोय झाली असती. मुखपृष्ठावरील चित्र अत्यंत आकर्षक असें आहे. पुस्तकाची छपाई पण चांगली झाली आहे.

**कर्णायनः—**

लेखक–श्री. **गोपाळ नीलकंठ दांडेकर**
प्रकाशक : श्री. **केशवराव कोठावळे,**
मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगांव मुं. नं. ४
किंमत ५ रु.

**—सदानंद चेंदवणकर**

## लिपीबद्ध 'घरेलु गाणीं'

मराठींत स्वरलेखनावर संगीत तज्ज्ञांचीं कांहीं शास्त्रोक्त पुस्तकें आहेत. स्वरलेखन हें जास्तींत जास्त व्यवस्थित केल्यामुळेंच कीं काय सध्या लोकगीतांना व लोकसंगिताला मोठें मानाचें स्थान प्राप्त होत आहे. डॉ. सरोजिनी बाबर यांचें लोकसंगीतनामक पुस्तक अलीकडेच सरकारतर्फे प्रकाशित झालें आहे. नुसतीं लोकगीतें छापून त्यांतील पारंपारिक संगीत बाजारी चालीमुळें लुप्त होईल कीं काय या भीतीनें सरोजिनीबाईंनीं आपल्या या बहुमोल ग्रंथात कांहीं ओव्या, देवादिकांचीं गाणीं, संस्कार गीतें, लग्नाचीं गाणीं, अंगाई, पाळणा, माजघरांतील गाणीं, पावसाचीं गाणीं इत्यादि गाणीं त्यांच्या सुरावटीच्या दृष्टीनें लिपीबद्ध करून ठेवलीं आहेत. त्याचा हा यत्न अभिनंदनीय आहे. हें स्वरलेखन शक्यतोंवर व्यवस्थित करण्याच्या कामीं सुप्रसिद्ध गायक श्री. गजाननराव नावडीकर यांचें त्यांना सहाय्य झालें. स्वरलेखनासाठीं उपयोगांत आणलेली स्वरलिपी पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांची आहे. मराठींत अशा प्रकारें प्रकाशित होणारें हें पहिलेंच पुस्तक होय.

( **लोकसंगीत** : लेखिका–डॉ. सरोजिनी बाबर, एम. ए. पी. एच. डी.; प्रकाशक–महाराष्ट्र शासन प्रसिद्धि विभाग, मुंबई ).

**—सदानंद चेंदवणकर**

●●●

# साभार–पोंच मे १९६३

**गंधखुळी**
लेखिका–सौ. निर्मला देशपांडे, प्रकाशक–ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर. रु. २–५०

**भाग्य**
लेखिका–सौ. वसुंधरा पटवर्धन, प्रकाशक–ग. परचुरे प्रकाशन मन्दिर. रु. ४

**कावेरी**
लेखक–शांन्ता ज. शेळके ' प्रकाशक–ग. पां. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर. रु. ४

**आंतला आवाज**
लेखिका–सौ. शिरीष पै, प्रकाशक–ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर. रु. ५

**हरवलें तें गवसलें का !**
लेखिका–सौ. सुमति धनवटे, प्रकाशक–ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, रु. ३

**मंगळसूत्र**
लेखिका–सौ. शिरीष पै, प्रकाशक–ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, रु. ३

**पश्चिमकडा**
लेखिका–तारा वनारसे, प्रकाशक–मौज प्रकाशन गृह. रु. ५–५०

**क्षिप्रा**
लेखक–शरश्चंद्र मुक्तिबोध, मौज प्रकाशन गृह, रु. ४–५०.

**द्विदलागण**
लेखिका–आरती प्रभु, मौज प्रकाशन गृह, रु. ४–००.

**सरहद्द**
लेखक–शरश्चंद्र मुक्तिबोध, मौज, प्रकाशन गृह, रु. ५–००

**ऐसा गा मी ब्रह्म**
लेखक–नारायण सुर्वे, अभिनव प्रकाशन, रु. २–५०.

**आताशी मगाशी**
लेखक–शां. शं. रेगे, अभिनव प्रकाशन, रु. ३–००.

**वेगळी,**
लेखक–अरविंद गोखले गोखले, मनोरंजन प्रकाशन, रु. ४–००.

**विघ्नहर्ती**
लेखक–अरविंद गोखले, सुविचार प्रकाशन मंडळ, रु. ५–००

**स्वरमेळ**
संपादक–श्री. बारमुख व साटक.
शशांक प्रकाशन.

**जाग**
लेखक–श्री. शांताराम पाटील, रंजना प्रकाशन, रु. ४–००.

**माओचें लष्करी आव्हान**
लेखक–दि. वि. गोखले, शब्दरंजन स्पर्धा प्रकाशन, रु. ०–५०.

**नवमी काव्य–संग्रह**
लेखक–५२ कवींच्या कविता, कवित्रय मंडळ, सहकारी प्रकाशन, रु. २–५०.

**वूड्रो विल्सन**
लेखक–पंढरीनाथ रेगे, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई २. रु. २–०

**सुभाषित कथा**
लेखक–श्री. नी. शं. नवरे, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स, प्रा. लि. मुं. २. रु. १–५०.

**जगणं म्हणजे शिकणं**
लेखक–एलिनॉर ई. रूझवेल्ट, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई. २. रु. २–५०.

**प्रत्यंचा,**
लेखक–अनंत करंबेळकर, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई. २. रु. २–००.

**पर्वताची हांक**
लेखक–श्री. श्रीकांत राय, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई २. रु. ०–९०.

**शुभमंगल झालें**
लेखक–वा. ल. वझे, गोकुळ मासिक प्रकाशन, रु. २–५०.

**आधुनिक भारतांतील यक्षप्रश्न**
लेखक–श्री. ब. ना. जोग, विवेक मुद्रणालय, प्रभादेवी, मुंबई २८.
रु. ३–००.








# ' सूझा ' चें दिशाभूल करणारें हिडीस चित्रप्रदर्शन—

' इतके दिवस पिकासोचें युग होतें, आतां माझें युग सुरूं होणार ! '

' मुख्यमंत्री राजकारणावर जेवढें पैसे मिळवतात, त्यापेक्षां जास्त पैसे मी माझ्या कलेवर मिळवतो. '

'माझी दोन शाळांमधून हकालपट्टी झाली होती, तरी मी कसा मोठा झालों पहा ! '

इत्यादि आत्मप्रौढीच्या वल्गना करणारा एक अहंमन्य चित्रकार म्हणजे सूझा. सध्याचें युग जाहिरात करणारांचें आहे हें पुरेपूर जाणणारा व त्याप्रमाणें प्रसिद्धीच्या सर्व तंत्रांचा उपयोग करून वागणारा असा हा गुणी चित्रकार आहे. कांहीं वर्षांपूर्वी विक्षिप्तपणानें वागून व त्याची जाहिरात करून प्रसिद्धि मिळवण्याचें जें तंत्र स्पॅनिश चित्रकार साल्व्हादोर दाली यानें वापरलें होतें, त्याच तंत्राचा उपयोग सूझा संध्या करीत आहे. दालीच्या आत्मचरित्रांत (The secret life of salvadore dali) त्यानें आपल्या विक्षिप्त मनोवृत्तीच्या अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. त्यावर विश्वास ठेवणें कठीण वाटतें. परंतु त्या पुस्तकानें त्याला प्रसिद्धि मात्र भरपूर मिळाली.

कांहींतरी लोकविलक्षण केलें कीं लोक त्याला वेडा तरी ठरवतात, नाहींतर ' जिनिअस ' तरी समजतात. या दोन्ही प्रकारांत सूझाचा समावेश होत नाहीं. तो एक कलेचा व्यापक आणि हुषार व्यापारी आहे. लोकांवर कशाप्रकारें छाप पाडावी, त्यामागें काय काय उपाय योजावेत हें सर्व आधीं ठरवून मग तो आपलें पाऊल पुढें टाकतो.

अशा या प्रसिद्ध चित्रकाराचें परवा ताजमहाल हॉटेलमध्यें जेव्हां प्रदर्शन भरलें, तेव्हां साहजिकच सर्वांची उत्सुकता तें पहाण्यासाठीं शिगेला पोहोंचली होती. तिथें निघालेले निरनिराळे उद्गार मोठे सूचक वाटतात.:

' एका अप्रतिम चित्रकाराच्या आंतरीय तळमळींतून निघालेल्या कलाकृती ' असे त्याचे भगत आणि आपले जाणते (!) टीकाकार म्हणाले.

' चित्रांतील कलेपेक्षां त्याची प्रसिद्धीच जास्त दिसते ' असें चित्रकार मण्डळींचें मत पडलें. (सध्याच्या प्रसिद्ध चित्रकारांपैकीं एक डझन चित्रकार तरी खाजगीरीत्या ! मला असं म्हणाले ).

### ' मी एक महान कलाकार '

' असल्या हिडीस चित्रांना कलाकृति म्हणावयाचें काय ? ' असें म्हणून सर्वसाधारण प्रेक्षकांनीं नापसंति व्यक्त केली.

याचा परिणाम काय झाला ? बहुतेक लोक आपल्याला यांतलें कांहीं समजत नाहीं म्हणून गप्प बसले. समव्यवसायी व प्रसिद्ध चित्रकाराविरुद्ध बोलणें अयोग्य म्हणून कलावान अबोल राहिले. पण युरोपमध्यें ज्याअर्थी सूझाची कला प्रसिद्धि पावली आहे, त्याअर्थी ती उत्तम असली पाहिजे म्हणून आमचे टीकाकार त्याच्या चित्रांतून नानाप्रकारचे गर्भित अर्थ व भाव शोधून काढूं लागले. टीकाकार व समीक्षक ज्याअर्थी ही कला उत्तम म्हणतात, त्याअर्थी आपणहि ती चांगली म्हटली पाहिजे, नाहींतर आपण उच्च बौद्धिक पातळीवरचे समजलों जाणार नाहीं असें समजून आमचे तथाकथित बुद्धिवादी धनिक लोक त्या चित्रांचा उदोउदो करूं लागले !

सूझा प्रसिद्धीकरता दिलेल्या एका मुलाखतींत स्वतः म्हणतो—

' सर्व कला प्रचारात्मक आहे. मायकेलँजेलोचें ' अन्तीम निवाडा ' (Last Judgement) हें चित्र ज्या अर्थानें प्रचारात्मक आहे, त्याचप्रमाणें माझ्या कलेमधून सुद्धां सर्व टीकाकारांना आणि रसिकांना मी एक प्रचारक (Propogandist) वाटतों; आणि म्हणूनच माझें महत्त्व दिवसेंदिवस वाढत जाणार ! '

' एकाद्या विवक्षित चित्रपद्धतीचा मला तिटकारा आहे. मी कोणत्याहि पद्धतीनें चित्रें काढूं शकतो. पण abstract art मला अजिबात आवडत नाहीं. '

' माझा मेंदू भयंकर तीव्र व चलाख आहे. कुठलीही गोष्ट मी एकदां पाहिली, कीं मी संपूर्णतः आत्मसात् करतों आणि मग मला पाहिजे त्या स्वरूपात (?) तिचे रंगात व रेषेंत रूपांतर करतों. '

### अनैसर्गिक तृष्णेचें रौद्र स्वरूप

हें समजल्यावर आता प्रदर्शनातील प्रत्यक्ष चित्रांकडे पाहूं या. प्रथमदर्शनींच असें मत होतें कीं मानवजातीचें हिडीस व विद्रूप दर्शन घडवणारीं हीं चित्रें आहेत. चित्रकार म्हणतो कीं या अणुयुगातील दुःख व यातना भोगणारी हीं माणसें आहेत ! ती दात विचकणारीं माणसें आणि त्या भयंकर व अचकटविचकट अवस्थेमध्यें रंगवलेल्या स्त्रिया पाहिल्यावर मानवतेबद्दल वाटणारें प्रेम व स्त्रियांबद्दलचें आकर्षण एकदम लुप्त होऊन जातें ! ज्या पद्धतीनें स्त्रियांचें दर्शन चित्रकारानें घडवलें आहे, तें कोणत्याही सुजाण व्यक्तीला अश्लील व अमंगल वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. अनावृत स्त्रीच्या सर्व भागांचें विद्रूप चित्रण करून कसल्या कलानिर्मितीचा आनंद चित्रकाराला मिळाला आणि तें पाहून त्यावर स्तुतिसुमनें उधळणाऱ्या आमच्या टीकाकाराना कोणतें सौख्य मिळालें हें समजणें कठीण आहे. हें सर्व विकृत मनाचें दर्शन चित्रद्वारा होत आहे असें वाटतें. आधुनिकतेच्या नांवाखालीं कांहीं तरी लोकविलक्षण करून बहुजनांच्या मनाला धक्का द्यावयाचा ही विचारप्रणाली आजकाल सर्व कलाक्षेत्रामध्यें पसरत आहे. परंतु हीं चित्रें खरीं आधुनिक नसून फक्त हीन मनोविकृतीचीं द्योतक आहेत. या उलट चित्रकलेच्या विचारात क्रांति करणारे ब्राक, क्ली, कॅण्डिन्स्की, रॉथ, मोंद्रियान वगैरे कलावान कोणालाहि आदरणीय वाटतात आणि यापुढेंहि वाटतील.

प्रदर्शनांतील कांहीं निसर्गचित्रें व रेखाचित्रें कलादृष्ट्या आकर्षक वाटतात. परंतु कोणत्याहि










अनुक्रमणिका

चित्रांत रंग व रूप (form) प्रामुख्यानें प्रतीत होत नाहीं. याला कारण सूझाची कला Expressionist आहे म्हणतात. पण त्यांतून एकच भाव सदा व्यक्त झालेला दिसतो. समाजाबद्दल वाटणारा तिटकारा, स्त्रीजातिविषयींची अनैसर्गिक घृणा आणि एकंदर जगाबद्दल वाटणारा सहानुभूतिशून्य घृणा. आणि म्हणूनच अशा कलेचा निर्माता genius न वाटतां विचार करण्यास योग्य अशी एक वैद्यकीय समस्या ( Pathologialcose ) वाटते.

**आयुष्याची दिशा चुकलेला चित्रकार**

कलेपासून विशुद्ध व मंगल आनंद मिळाला तर ती उच्च कला म्हणतां येईल. मग तो आनंद alstract चित्राच्या रंगरूपामुळें मिळो वा एकाद्या चित्रांतील निसर्गरम्य दर्शनापासून मिळो. हीच कसोटी इतर कलांना लागू आहे. अश्लील कलेपासून मिळणारा आनंद तात्कालिक व हीन दर्जाचा असतो हें सांगणें न लगे.

एकंदरींत हें प्रदर्शन अनेक दृष्टींनीं उल्लेखनीय झालें. पैसे खर्च करून चित्रकारानें केलेल्या प्रसिद्धीकरणाचा हा पहिलाच उपक्रम आपल्याकडे असावा. युरोपमध्यें हा प्रकार सर्रास चालू आहे. एकाद्या गॅलरीचा संचालक, वर्तमानपत्रांचे समीक्षक व बातमीदार एकत्र येऊन कोणा अनोळखी चित्रकाराचें रूपांतर जगप्रसिद्ध चित्रकारांत पॅरिसमध्यें एका रात्रींत करतो हें खोटें नाहीं.

सूझा एक उत्कृष्ट लेखक आहे. त्याच्या चित्रापेक्षां लेखनांत जास्त गुण आढळतात. त्यामुळें असें वाटतें कीं हा कलावान आपल्या आयुष्याची दिशा तर चुकला नाहीं ना ?

—माधव सातवळेकर

# असा बोलर होणें नाहीं

महम्मद निसार लाहोर येथें निधन पावल्याची बातमी अलीकडेच आली; आणि ती वाचतांच पडद्याआड गेलेलें ते आपल्या क्रिकेटचें पर्व पुन्हा डोळ्यांपुढें टाकलें. तें पर्व ज्यांनीं घडविलें, त्याला प्रतिष्ठा दिली, त्या बहाद्दरांच्या आघाडीवर निसार होता.

चौरंगी सामन्याचीं शेवटचीं तीन वर्षें आणि पंचरंगी सामन्यांचीं पहिलीं तीन, अशा त्या सहा वर्षांत ( १९३४–१९३९ ) निसारनें मुंबई हालविली. क्रिकेटचा ओनामा माहीत नसणारे किंवा तेवढाच माहीत असणारे–निसारला पहायला येत, आणि पाहावें, डोळे भरून पाहावें, असें वैभव त्याच्यापाशीं होतें–नुसते आडमाप देहाचें नव्हे, तर त्याच्या बोलिंगच्या धडाक्याचें. आणि हा धडाका म्हणजे बळजोर मुसंडी नव्हे. त्यांत केवढी शान होती. सहा फुटी उंची, क्रिकेटच्या पध्याशीं विसंगत अशी रुंदी, एरव्हीच्या हालचाली जरा सुस्तच. पण माणुस बोलिंग करूं लागला कीं त्याच्या अंगांत असें कांहीं तळपे कीं प्रेक्षकांतून चमक उठावी, आणि ती हमखास उठे. चेंडू टाकण्यापूर्वी धांव घेण्यासाठीं वीसएक पावलें मागें चालत जायचें तें अति संथपणें पण डौलात. अर्धीअधिक धांवहि तशाच सहजपणें होई, पण पावलापावलाला गति फुलल्यासारखी व्हायची. त्यांत अंगची लय असे. ती विलंपतीतून द्रुतमध्यें कधीं जाई हें कळायचें नाहीं.

आणि अगदीं शेवटी चेंडू टाकण्यापूर्वी, मारलेल्या उसळींत कसलें भीम अवसान यायचें, आणि पाहाणाऱ्याला लक्कन् व्हायचें, मग समोर खेळणाऱ्याला काय होत असेल ? आणि चेंडू टाकून होतांच स्वतःला पुरें सावरायचें. उगाच पिचवर तांडव नाहीं कीं तोल सांभाळण्याची फेंगडी धडपड नाहीं. मग पुन्हा धांव घेण्यासाठीं मागें—'नमवित धरणी' आणि धीरगंभीरपणें. तें सगळें स्वच्छ दिसत आहे आणि या सगळ्या दरबारी ढंगाला साजेल असा फ्लॅनेलचा रेखीव पोशाख.

चौरंगी सामने बॉंबे जिमखान्यावर होत; त्या आटोपशीर मैदानाभोंवतालच्या तंबूतून खेळाडू जवळून दिसत, पुऱ्या माणसांसारखे दिसत. तेथें निसार असला तर इतर बरींच माणसें अपुरी वाटत ! ब्रेबर्न स्टेडियमच्या अचाट विस्तारांत खेळाडू तसा उठून दिसणें कठीण. तरी तुलनेनें अर्थात निसार डोळ्यांत भरायचाच...पण मनांत ठसली आहे ती त्याची प्रतिमा बॉंबे जिमखान्यावरची.

ती खरी जोड प्रतिमा आहे. एकट्या निसारची नव्हे. जोडीला सी. के. नायडूची. त्यावेळीं खरी चुरस असे ती हिंदु आणि मुसलमान संघांत. इतर संघ चौरंगाला टेक देण्यापुरते. हिंदूंतहि नायडूखेरीज महारथी होते. त्याच्याहून अधिक 'सरासरी' गांठणारे. पण जाणकार जीव टाकीत नायडूचा खेळ बघायला. त्यातहि नायडू निसारचें द्वंद्व पहायला. ज्यांनीं पाहिलें त्यांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें; ज्यांनीं पाहिलें नाहीं ते हतभागी ! निसारची बोलिंग आक्रमक, वेगवान् आणि टिपून टाकलेली; नायडूचा खेळ सवाई आक्रमक, चेंडूच्या वेगावर मात करून, बोलिंग खिळखिळी करण्यासाठीं, पुढें जाऊन ठोकायचे; कधीं मागे पाय टाकून नजाकतीची 'लेटकट्' मारायची. उगाच जोर काढून नाहीं; मनगटाच्या पोलादी कसबानें आणि पुन्हां सगळें कसें देखणें. पुढें रूढ झालेला, 'सरासरी' मागे धावणारा कातडीबचावाचा सावध खेळ नव्हे. कसबासाठीं खेळलेला खेळ, आंकड्यासाठीं नव्हे. आपल्या तोलाचा प्रतिस्पर्धी म्हणून दोघांनीहि शिकस्त करायची; होष चढायचा आणि एकमेकांविषयीं मोठा आदर. मला आठवते कीं निसारने नायडूला कधीं शतकापर्यंत पोचूं दिलें नाहीं. पस्तीस की छत्तीस साली एकदा उपाहाराच्या सुटीपर्यंत नायडूच्या ९७ धांवा झाल्या होत्या. सुटीनंतर ही झुंबड उडाली नायडूच्या जयघोषासाठीं. पण आणखी एकहि धांव होण्यापूर्वी निसारने नायडूची विकेट उध्वस्त केली. चौकारानें शतक फडकविण्याची नायडूची जिद्द. तें हुकल्याचा विषाद नव्हता. त्यानें म्हणे त्या बॉलच्या अचूकपणाचा गौरव केला. असा समरया संयोग.

१९३२ मध्यें हिंदुस्थान आणि इंग्लंड यामधील पहिला कसोटी सामना झाला. इंग्लंडचा डाव सुरू झाला तेव्हां सलामीला आपली जोडी होती ती निसार आणि अमरसिंग. त्यांनीं आरंभी अचाट पराक्रम केला. पहिल्या तीन विकेटस्चा धुव्वा उडवला. साहेबाच्या तोंडचें पाणीच पळवलें. ती कीर्ति पाठीशीं घेऊन १९३३ मध्यें मुंबईत इंग्लंडशीच जो कसोटी सामना झाला त्यांत तो उतरला व तेथेंहि दीर्घकाळ पल्लेदार बोलिंग टाकून त्यानें कीर्ति सार्थ केली. 'गोलंदाजी' हें बोलिंगचें चमत्कारिक मराठीकरण मला वाटतें त्याच सुमारास आलें; निसारच्या बाबतींत त्या शब्दाला अर्थ होता.

...पण त्यानें कधीं अंगावर 'आपटबार' टाकून खेळणाऱ्याला इजा करण्याची वा भेडसावण्याची दांडगाई केली नाहीं. परवाच कोठें वाचलें कीं एकूणचाळीसच्या हिंदु संघाविरुद्धच्या सामन्यांत वझीर अल्लीनें कप्तानपदाच्या अधिकारांत तसले चेंडू टाकण्यास










निसारला फर्मावलें, पण निसारनें तें मानलें नाहीं ! केवळ सामना जिंकण्यासाठीं तो खेळत नव्हता. तेंच त्याचें शेवटचें वर्ष असावें !

त्यावरून एक गोष्ट आठवली; श्री. गोडांबे या चौरंगी सामने गाजविलेल्या खेळाडूकडून नुकतीच ऐकलेली. जलद बोलिंग म्हणजे एखादा बंपर येणारच. निसारचा असाच एक चेंडू नायडूच्या कपाळाला लागला. कांहीं झालेंच नाहीं अशा अविर्भावात, पण टोपी जरा खाली ओढून, नायडूनें खेळ पुढें चालवला. बाद होऊन परत आल्यावर अनेकांनीं नायडूंना 'लागलें का ?' म्हणून विचारलें. त्यांनें 'बिलकूल नाहीं' म्हटलें. पण गोडांब्यांना राहावेना. ते ड्रेसिंग रूममध्यें गेलें. पुन्हा विचारलें; नायडू दाद देईना–तेव्हां स्नेहाच्या जरबीनें त्यांनीं पुन्हा खडसावून विचारलें, आणि टोपीला हात घातला. भले मोठे टेंगूळ आलें होतें; तो भाग काळा निळा झाला होता. नायडूनें तें सगळें हंसण्यावारी घालवलें. अशा जखमांची तमा बाळगूं नये असा धट्टपणा 'सीके 'त होता. "आतां तो गेला" गोडांबे खेदानें म्हणाले.

पस्तीस साली क्वेट्याला भूकंप झाला त्यांत निसार गेल्याची अफवा त्यावेळीं पसली होती. सुदैवानें ती खोटी ठरली. पण त्याचें क्रिकेट जीवन त्यानंतर पांच वर्षांतच संपुष्टांत आलें. त्यानें प्रेक्षकांचा अंत पाहिला नाहीं. ज्या बेफिकिरीनें तो बोलिंगला आरंभ करीत असे, त्याच बेफिकिरीनें त्यानें बोलिंग थांबवली.

—वारकरी

---

# नमुनेदार अनुकरण

कलावंताच्या खऱ्या गुणांना कस लावून त्याच्या अभिनयाची योग्य कसोटी लावणारे एकपात्री कार्यक्रम म्हणजे खऱ्या कलावंतांना एक प्रकारचें आव्हानच. खरा कलावंत मोठ्या हिरीरीनें त्या क्षेत्रांत पाऊल टाकतो. 'बटाट्याची चाळ' ह्या पु. लं. च्या बहुरूपी कार्यक्रमानें असामान्य यश मिळवलं. एकपात्री 'सौभद्र,' 'शारदा' (रेडियोवरील मा. दत्taराम यांचं 'हॅम्लेट') हे ह्या क्षेत्रांतले कमी अधिक गाजलेले प्रयोग. आधींच लोकप्रिय झालेल्या नाटकांचे प्रयोग एकाच व्यक्तीनं करणं एवढंच त्यांचं 'चाळी' शीं साम्य. परंतु 'चाळी' च्या धर्तीवर त्याच जातीचा स्वलिखित प्रयोग केला मुरलीधर राजूरकर यांनीं. 'नमुनेदार माणसं' हें 'बटाट्याच्या चाळी' चं पहिलं अनुकरण.

प्रकारापुरतंच हें ऋण मर्यादित राहिलेलं नाहीं. पु. लं. नी हाताळलेले प्रसंग व व्यक्ति राजूरकरांनीं पुन्हां एकदां हाताळल्या आहेत. अर्थात स्वतःचा असा खास रंग त्यांनीं बराच भरला असला तरी सांचा पु. लं. चाच ! तुलनेची ही अपरिहार्यता उद्भवली नसती तर राजूरकरांचं कौतुक अधिक झालं असतं असं वाटण्याइतपत त्यांनीं आपल्याविषयीं अपेक्षा निर्माण केल्या आहेत. रोजच्या जीवनांतील बारीक सारीक गोष्टी कुशलतेनें टिपून चांगल्या रीतीनें मांडल्या आहेत. त्यांचीं माणसं रंगतात, खुलतात. कंटाळवाणी वाटत नाहींत मुळींच. त्यांच्या विनोदांत सौम्यपणा बराच आहे. 'पुं. लं. ची पट्टी वरची आहे. पु. लं.चा निषाद तर ह्यांचा रिषभ' हे सुवर्ण महोत्सवी प्रयोगाचे अध्यक्ष आचार्य अत्रे ह्यांचे उद्गार अगदीं सार्थ आहेत.

समाजाच्या विविध थरांत जीं माणसं वावरतात, त्यांच्या स्वभावांतील, वागणुकींतील विसंगतीचं विडंबन हेंच 'नमुनेदार माणसं' ह्या कार्यक्रमाचं मुख्य भांडवल. अंतरपाट दूर झाल्यापासून शांती न मिळालेले जुन्नरचे पेन्शनर अण्णा कार्यक्रमाच्या सुरवातीला सहकुटुंब सहपरिवार बाडबिस्तरा घेऊन पुण्यांत स्थायिक होण्यास येतात. अखेरीस पानशेतच्या प्रकोपामुळं रिक्त हस्तानें जातात पण प्रेक्षक मात्र तृत अंतःकरणानं घरीं जातात ! ह्याचं प्रमुख कारण म्हणजे त्यांनीं मनुष्य स्वभावाचं केलेलं नेटकं व खुसखुशीत वर्णन व समर्थपणें उभ्या केलेल्या विविध नमुन्याच्या अनेक व्यक्ति आणि वल्ली ! उत्कट हास्यांत ह्या कार्यक्रमाचा शेवट होता तर अधिक समाधान वाटलें असतें. 'एक चिंतना' प्रमाणें आपल्याही कार्यक्रमाला दुःखाची झालर लाभावी म्हणून पानशेतच्या शोकान्तिकेचा अकारण जोडलेला भाग बराच कृत्रिम वाटला.

एकपात्री कार्यक्रम सोयीस्कर व अभिनव असला तरी त्याच्या मर्यादा एवढ्यांतच स्पष्ट झाल्या आहेत. अभिनयसामर्थ्य, वाक्पटुत्व, संवादाच्या जोडीला समर्थ निवेदन अशीं अनेक अवधानं सांभाळून, प्रयोगाच्या रंगतीचा धोका पत्करून असले कार्यक्रम सादर करावे लागतात. इतकंही करून कार्यक्रम न रंगल्यास, या कार्यक्रमानें येईल तेवढा कंटाळा दुसऱ्या कशानेंही येणार नाहीं. मोठ्या जिद्दीनें, परिश्रमपूर्वक हा कार्यक्रम सादर केला तरी अखेरीस हें सारें नकलां 'तन्त्र जमा-ल्याला स्वतंत्र कलामूल्य नाहीं. अशा ह्या पार्श्वभूमीवर लेखक किंवा नट म्हणून प्रसिद्धीचं तेजस्वी वलय, पु. लं. सारखं असामान्य व्यक्तिमत्व नसतांना, एकेकाळीं कारकुनी पेशा स्वीकारणाऱ्या राजूरकरांनीं मोठी जिद्द बाळगून, स्वतःच्या हिंमतीवर कार्यक्रम सादर करून सुवर्णमहोत्सवी प्रयोगापर्यंत यश गाठावं, ह्या दृष्टीनें त्यांच्याबद्दल अपार सहानुभूति व कौतुक वाटतं आणि 'राजूरकर हें नाट्य क्षितीजावरचें नवें नक्षत्र आहे' हा आत्रेय गौरवही यथार्थ वाटूं लागतो. !

### जुनी परंपरा, नवा प्रयोग

मराठी रंगभूमीचा जन्मच मुळीं संगीताच्या स्वरांच्या साथींत झाला. मराठी रंगभूमीनें संगीताचा शोक रसिकतेनं, चोखंदळपणें मनमुराद केला. मराठी रंगभूमीच्या उज्ज्वल संगीत परंपरेला उजळा देणारं १९६३ सालांतलं नाटक म्हणजे श्री. विद्याधर गोखल्यांचं 'मंदार–माला'.

'सौभद्र' 'मानापमान' आदी गाजलेल्या संगीत नाटकांना वाट पुसतच प्रस्तुत नाटक लिहिलं आहे. उपर्युक्त जुनीं नाटकं आजही रसिकांना आवडतात. मग त्याच नाटकांना आदर्श डोळ्यापुढें ठेवून, पण आजच्या मापक रसिकतेच्या कालमानानुरूप योग्य वाटेल तें तंत्र वापरून सादर केलेल्या 'मंदार–माले 'तील गुण नि गंध रसिकमान्य होणं रास्तच. 'मंदार-माले 'चीं चाल ही अशी आहे.

अडाणी अहंकाराच्या आहारीं जाऊन पाखंडी बनलेल्या कोण्या एका स्त्रीद्वेष्ट्या मध्य–युगीन संगीतकाराची ही कहाणी. मीराबाईच्या भजनांचे रागच जाणणारा पण त्यांतील वेदनांचा अर्थ न समजलेल्या मंदारनं, भाव-भक्तीच्या बळावर स्त्री द्वेषाच्या विषबाधेपासून रत्नमाला मधुर परिवर्तन करते आणि संगीताचा हा शेर मोहवर्त्ताच्या महलींचे शेर बोलूं लागतो हेंच मुख्य सूत्र.

संगीतकाराच्या जीवनाचे पैलू दाखवणाऱ्या ह्या कथेंत संगीताच्या विविध आविष्कारांना









**प्राधान्य मिळणें क्रमप्राप्तच. राम मराठे यांनीं या नाटकाला संगीताचा दर्जेदार साज उत्तम चढविला आहे. त्यांच्या प्रतिभेनें नव्या दिशेनें मारलेली ही एक भरारी.** राम मराठे संगीताच्या **दुनियेंतील जुने** मानकरी. गाजलेलीं जुनी संगीत **नाटकें** रामभाऊंच्या गोड स्वरविलासांनीं नव्यानें **अनेकदां** नटली. गायक नट म्हणून ते रसिकांना परिचित असले तरी संगीत नियोजक ही त्यांची 'भूमिका' सर्वस्वी अपरिचित. ह्या भूमिकेंत सुद्धां त्यांनीं मैदान जिंकली आहे. सामान्य माणसाला रिझवणारं पण अभिजात संगीतानं बहरलेलं संगीत त्यांनीं नियोजिलेलं आहे. जणूं सारी प्रतिष्ठा पणास लावून भावमधूर बिनतोड रागांची निवड केली आहे. राम मराठे, प्रसाद सावकार, ज्योत्स्ना मोहिले ही गायनकलेंतील वाकबगार मंडळी–त्यांच्या गायगुणांचें भरपूर दर्शन ह्या नाटकांत घडतें, आणि रसिकांचें कान तृप्त होतात! अहिरभैरवांतल्या प्रारंभीच्या नमनापासून सुरूं झालेली अभिजात संगीताची मेजवानी रंगत ती अखेरच्या जुगलबंदींतील बसंतबहारापर्यंत-मेजवानी जास्त असती तर बरं झालं असतं इतकं वाटण्याएवढी!

संगीताला वाव दिल्यामुळें पात्रांच्या स्वभावाच्या छटा रेखीव न होतां, कथानकाचा विकासही ठिसूळपणें झाला आहे. संवाद कांहीं ठिकाणीं कल्पकतापूर्ण आहेत. तर कांहीं ठिकाणीं संस्कृत, मराठी व उर्दू भाषेच्या सुंदर मिलाफांतून घडवलेलीं शब्दसुमनें मुक्तपणें उधळल्यामुळें कृत्रिम भरजरीपणा आहे. प्रसंगांतून, संवादांतून नाटक चढत नाहीं, खुलत नाहीं. गाण्यानेंच खुलतें–कथानकापेक्षां गाण्यालाच प्राधान्य देणाऱ्या 'त्या' परंपरेला साजेसं! फार काय, अखेरीस महाराजांनीं रत्नमालेचा हात मंदारच्या हातीं देण्यांत सुद्धां, नाटक संपतांना नायक–नायिकेचं मीलन झालेंच पाहिजे हा जुना संकेतच पाळलेला आहे. (ह्या ठिकाणीं महाराजांच्या तोंडीं 'नांदा सौख्यभरे–' सारखी साकी घातली असती म्हणजे हा संकेत सर्वार्थानं पूर्ण झाला असता. आणि मराठी रंगभूमीवरील गाणाऱ्या शिवाजीच्या परंपरेशीं ते शोभून दिसलं असतं!)

अभिनयाच्या बाबतींत डावंउजवं करण्यासारखं कांहीं नाहींच, परन्तु मकरन्दाची भूमिका सुरेख व सफाईनें वठविणाऱ्या पंढरीनाथ बेर्डे, भैरवाची भूमिका हरसालपणानं करणाऱ्या शंकर घाणेकरांचा उल्लेख करायला हवा. सौ. सुधा करमरकरांनीं प्रयोग बसविला आहे सुटसुटीत, पण आपल्या भूमिकेंत त्या मुळींच समरस झालेल्या दिसल्या नाहींत. नृत्यांतही त्या निराशा करतात. कानिटकरांची नेपथ्य रचना ठीक होती. निव्वळ तांत्रिक करामतीकडे लक्ष न दिल्यामुळें नेपथ्याची कथावस्तूवर, अभिनयावर उघड उघड झालेली मात पहावी लागली नाहीं हेंही समाधान नसे थोडके?

नाटकाचा परंपरागत विशुद्ध रंजनप्रधान आणि कलात्मक संगीत बाज गोखल्यांनीं सच्चेपणानं उभा केला आहे. कथासुद्धां परंपरागत प्रासादिकपणें, मनोविश्लेषणात्मक खटके, समस्याप्रधान हरकती आदी कसरती न करतां साध्या नि सरळपणें सांगितली आहे. जुन्या संगीत नाटकांच्या ठेकेदारी चौदा कॅरेटच्या प्रयोगांनीं आणि नवनाटयाच्या बेगडी प्रकारांनीं उबग आलेल्या रसिक मनाला हा प्रासादिक बाज, हें अभिजात संगीत, हें सहजरम्य नाटय विलक्षण भुरळ घालतें खास!

**—रसिक मनोहर**

---

पान ४९ वरून...

हें ऐकून मी चमकलों. अस्वस्थ होऊन स्वतःशीच जागच्या जागी चुळबूळ केली आणि ऐकूं लागलों.

'खूप बोललों त्या दिवशीं आम्ही. मुंबईला उतरण्यापूर्वी त्यांनीं माझ्याकडून लग्नाचं वचन घेतलं.

'आईच्या मायेनं मी त्यांना जेऊं खाऊं घालणार होतें, कान्तेच्या नात्यानं मी त्यांच्याशीं शय्यासोबत करणार होतें आणि कंपनीच्या कारभारांत दक्ष राहून पैशा अडक्याचे व्यवहार पाहणार होते...दात्यांना सर्व परीनें कायमची सांभाळणार होते...

'पण—

'माझ्याबद्दलचं त्यांचं वेड लवकरच कमी झालं. माझी भीति खरी ठरली. पुरुषाला वत्सल पत्नी लागते पण दात्यांचं तें वय अजून यायचं होतं.

'चव घेतलेल्या अमृत फळाची गोडी लागावी आणि मग तृप्ती होईतों थांबतां येऊं नये हा तर निसर्गाचा धर्म पुढं पुढं दाते वाहवत चालले, स्त्रीलंपट होऊं लागले. एखाद्या 'एक्स्ट्रॉ'च्या सोबतीसाठीं सुद्धां त्यांचा वेळ आणि पैसा खर्च होऊं लागला. मला सारं दिसत होतं; समजत होतं; पण सांगून उपयोग होत नव्हता. होणार नव्हता. अलीकडे पुष्कळ वेळां विचार येई कीं, एखादी चांगली पोर पाहावी आणि आपल्या हातानंच दात्यांना बायको करून आणावी. पण मला हा मोठेपणा मिळायचा नव्हता. माझी माया त्यांना कधीं समजलीच नाहीं. आतां तर सारंच संपलय...

'पत्र आलंय आज दात्यांचं. त्यांना मुक्त करायला चाललेंय् मी आज मुंबईला. नको नको म्हणत असतां माझ्याशीं हट्टानं लग्न केलं. आणि आतां मला न सांगतां सवरतां-माझा कांहीं विचार न घेतां–माझ्यापासून घटस्फोट घ्यायचा ठरवलाय त्यांनीं...

"तूर्त नादीं लागले आहेत ती बयासुद्धां चांगली नाहीं, खूप रंगढंग केलेत आतांपावेतों मेलीनं. पण सांगून ऐकायचे नाहींत. काळजी वाटते. मेली त्यांना धू धू धुईल. उरलं सुरलं नाहीसं करील आणि एक दिवस त्यांना सोडून पळून जाईल. कसं होईल हो त्यांचं...

"पण हा प्रसंग कधींतरी येणार...नक्की येणार असं मला प्रथमपासून वाटत होतं. आणि ज्या दिवशीं मी त्यांना लग्नाला सम्मति दिली त्याच दिवशीं माझ्या मनाला मी असंहि बजावलं होतं कीं, 'ते म्हणतील तेव्हां त्यांना माझ्या लग्नबंधनांतून मुक्त करायचं...' पण वाटलं होतं तेवढं हें सोपं नाहीं. जड जाईल मला.

बाई धूम रडत होती. तिचं सांत्वन करणं मला शक्य नव्हतं. बांध फुटून दुःख वाहून जात आहे तर जाऊं देत म्हणून मी चूप होतों.

एक सुंदर–ताठर व्यक्तिमत्त्व माझ्यापुढं अगतिक होऊन आक्रंदत होतं आणि तें पाहणं माझ्या वांट्याला कां यावं? याचं कोडं उलगडण्याचा मी यत्न करीत होतों...

●●

अनुक्रमणिका





MAR.
हुशार विद्यार्थी
नेहमीं
टिनोपाल
वापरून कपडे
जादा पांढरे शुभ्र
ठेवतात
पांढऱ्याशुभ्र कपड्यांचे रहस्य
टिनोपालचा नियमित वापर हेंच चमकदार पांढऱ्याशुभ्र कपड्यांचें रहस्य होय' हें प्रत्येक हुशार विद्यार्थी चांगलें जाणतो. पातळें, पोलकीं, शर्ट, पँट आदींसाठीं नेहमीं टिनोपाल वापरा.
टिनोपाल वापरण्यास खर्च अगदीं कमी येतो — एक बादलीभर कपडे पांढरे शुभ्र करण्यासाठीं चहाचा पाव चमचा टिनोपाल पुरतें. टिनोपालनें आलेली पांढरीशुभ्र चमक कपडे तीन ते चार वेळां धुतले जाईपर्यंत जशीच्या तशी कायम टिकते — कपडे धुतल्यावर प्रत्येक वेळीं टिनोपाल वापरण्याची जरूरी नाहीं.
टिनोपाल हा जे. आर. गायगी एस. ए. बाल, स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेड मार्क आहे.
थोड्याशा
टिनोपालनें
सफेद कपडे सर्वांत अत्यंत
शुभ्र बनतात










मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




# आकाशवाणीचे कल्पक उपक्रम

भारतीय आकाशवाणी निरनिराळे उपक्रम योजित असते हे तीक्ष्ण कर्ण श्रोत्यांना माहीत आहेच. आकाशवाणीच्या निरनिराळ्या कद्रांत कार्यक्रमाची नाविन्यता प्रगट करण्याची अहमहमिका चालू असते. ह्यामुळें अनेक केंद्रें एकाच वेळीं चांगले कार्यक्रम सादर करतात आणि बिचाऱ्या श्रोत्यांना दोनच कान आणि जवळ एकच रेडिओ सेट असल्यामुळें हें मनरंजन अथवा ज्ञानसत्र एकाच वेळीं टिपून घेणें अशक्य ठरतें. मुंबई ह्या सर्व केंद्रांत नाविन्याबाबत अग्रेसर ठरलें आहे हें सुप्रसिद्ध आहे. काव्यगायन, चर्चा, प्रश्न-माला, कीर्तन-प्रवचनें, गांवकरी खेडुतां-साठीं कार्यक्रम, श्रमजीवी श्रोत्यांसाठीं मनोरंजन, विद्यापीठासाठीं, शालेय विद्यार्थ्यां-साठीं ज्ञानसत्र, हलकीफुलकीं विनोदी वक्तव्यें इत्यादि अभिनव कार्यक्रमांची झलक प्रत्यही सुरू ठेवण्यांत या केंद्रानें आघाडी मारली आहे. चीनचें आक्रमण सुरूं झालें आणि मुंबई केंद्राच्या 'जिंकू अथवा म्हरू' ह्या साप्ताहिक माध्यान्हिक कार्यक्रमानें वाम-कुक्षी घेणाऱ्या श्रोत्यांत चेतना उत्पन्न केली. ह्या कार्यक्रमाच्या वैविध्यपूर्ण प्रयोजनानें आणि सादर कर्त्यांच्या वैशिष्टयपूर्ण प्रयोजनानें पुरेसी जागृति झाली असल्याचें आढळल्यामुळें केंद्रानें हा कार्यक्रम आवरता घेतला आहे हें ठीकच झालें. नाहीतर सर्व श्रोते चैतन्यानें सळ-सळून आघाडीवर गेले असते तर पिछाडी उघडी पडली असती आणि मग आकाश-वाणीचे कार्यक्रम फक्त महिलासाठीं आणि बच्चांसाठींच करावे लागते. ह्या कार्यक्रमानें प्रेरित होऊन इमर्जन्सी कमिशनसाठीं इतकी गर्दी झाली कीं सरकारला त्यामुळें तो उपक्रम बंद करावा लागला असें म्हणतात.

गेल्या महिन्याच्या नऊ तारखेला मुंबई केंद्रानें एका नवीन उपक्रमाद्वारें आपल्या कल्पकतेवर आपणच कढी केली आहे. 'यांचा जन्म हंसविण्यासाठीं' ही एक अभिनव व्याख्यानमालिका त्या दिवशीं सुरू केली व त्यांत थोर विनोदमूर्तीचें सहकार्य मिळवून तिला नाविन्याची जोड दिली. मराठी साहि-त्यांत जे थोर विनोदकार होऊन गेले आणि अस्तित्वांत आहेत त्यांची हजेरी ह्या व्याख्यानमालेंत लागणार आहे असें आकाश-वाणीच्या मुखपत्रावरून ध्वनित होते. ह्यापैकीं आद्य विनोदाचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे आपल्या दोन पात्रावर ( बंडूनाना आणि पांडू-तात्या ) परिचयात्मक वक्तव्य नऊ एप्रिलला झालें. वृत्तपत्रांत आगाऊ जाहीर झाल्यामुळें 'श्रीपाद कृष्णांची कलावती वाणी' ऐकण्यास त्या रात्रीं श्रोत्यांची खूपच गर्दी झाली असावी ( कारण शहरांतलें इतर सांस्कृतिक कार्यक्रम व सिनेमागृहें ओस पडल्याची बातमी नंतर प्रसृत झाली होती. ) श्रीपाद कृष्णांचा आवाज ऐकण्यास बालगोपाल उत्सुक होते तर पांडुतात्या बंडूनानांच्या पुनर्परिचय पितृमुखांतून ऐकण्यास प्रौढ श्रोते अधीर झाले होते. प्रस्तुत वक्तव्य नियोजनाप्रमाणें झालें व रंगलें असें सांगतात. खुद्द आकाशवाणीनेंही ह्या कार्यक्रमाच्या अभिनवतेची गुप्तता इतकी राखली होती कीं हें ध्वनिमुद्रण होतें की सजीव वाणीविहार होता ह्याचा पत्ता तिथल्या अधि-काऱ्यांपैकीं कांहींना नव्हता ( असें त्यांच्या कुतुहलजन्य पृच्छेवरून नंतर समजलें ) कांहीं असो आमच्या मतें श्रीपाद कृष्णांच्या वक्त-व्याची ती ध्वनिमुद्रिका तरी असावी किंवा विनोदाचार्य स्वर्गांतूनच खुद्द बोलत असावेत. ( आणि मुंबई केंद्रानें ते वक्तव्य सहक्षेपित केलें असावें ) कारण त्यांचा आवाज एवढ्या मोठ्यानं लागला होता कीं ट्रंककॉलमधून जसा ऐकूं येतो तसा उच्च स्वर ऐकूं येत होता. कांहीही असो, एक अपूर्व श्रवणीय वक्तव्य पदरांत पडले हें निश्चित. वक्तव्यानंतर बुलाऱ्यानं निवे-दित केल्याप्रमाणें आगामी वक्तव्य राम गणेश गडकऱ्यांचे असल्याचे समजते. तदनंतर कै. ना. धों. ताम्हनकरांची पाळी आहे. प्रचलित पिढीच्या एकिवांत नसलेल्या ह्या थोर विनोदा-चार्यांच्या मधुर वाणीचे श्रवण करण्याचे पुण्य प्रस्तुत उपक्रमानें त्याना मिळणार असल्यामुळें मुंबईच्या आकाशवाणी केंद्राच्या कल्पक अधिकाऱ्यांनां धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. आकाशवाणीच्या लहरी स्वर्गा-पर्यंत पोचू लागल्यामुळें इंद्रसभा देखील विविध भारतीच्या कार्यक्रमानीं डोलूं लागेल व ह्या वशिल्यामुळें चित्रगुप्ताला स्वर्गांतली आकाश-वाणी ( पुन्हां एकदां सुरू करण्यासाठीं ह्या कल्पक शास्त्रज्ञांना स्वर्गाचे दरवाजे यथाकाल खुले राहतील. ह्यापेक्षां इहलोकी केलेल्या आपल्या पुण्य कर्मांचे अधिक चांगलें फळ मर्त्यजीवाला कोणतें मिळणार बरें ?

## पंडित राहुल सांस्कृत्यायन

**एप्रिल** महिन्याच्या चौदातारखेला सुप्रसिद्ध हिंदी पंडित, बौद्ध धर्माचे व्यासंगी अभ्यासू, बहु-भाषा कोविद व प्राच्यविद्या संशोधक असे राहुल सांस्कृत्यायन ह्यांचें दार्जिलिंग येथें वयाच्या सत्त-राव्या वर्षी निधन झाल्यामुळें भारतीय विद्वत्तेचें फार मोठें नुकसान झालें आहे. राहुलजींना प्रवासाची फार आवड असल्यामुळें त्यांनीं तिबेट व रशियाचा तीन चार वेळां प्रवास केला होता. सिलोनच्या व लेनिनग्राडच्या विद्यापीठांत संस्कृत भाषेचें अध्यासन गौरविलेले असे ते एकमेव भारतीय पंडित होते. राहुलजी हिंदी भाषेचे एक ख्यातनाम साहित्यिक होते तसेंच पाली भाषेचा त्यांचा गाढा अभ्यास होता. ह्या तीन भाषांत त्यांनीं सुमारें एकशेंसत्तर ग्रंथ लिहिले होते व ते परकीय भाषात अनुवादित झाल्यामुळें त्यांच्या विद्वत्तेला आंतरराष्ट्रीय मान्यता प्राप्त झाली होती. ह्याशिवाय अनेक भारतीय बोलीभाषा तसेंच स्लाव्ह भाषा इत्यादि-छत्तीस भाषांत ते पारंगत होते. राज्य घटनेचा हिंदी अनुवाद करण्यासाठीं नेमलेल्या त्रिसदस्य समितीचे ते सभासद होते. हिंदी साहित्य संमे-लनाचेंहि ते अध्यक्ष होते. बनारस विद्यापीठानें महापंडित व सिलोन विद्यापीठानें त्रिपीठाचार्य अशा पदव्या देऊन त्यांचा गौरव केलेला होता. त्यांच्या वाङ्मयीन व संशोधन कार्याप्रमाणें राजकारणांतीलही त्यांचें कर्तृत्व उल्लेखनीय आहे. असहकार चळवळींत हिरीरीनें भाग घेऊन त्यांनीं कारावास भोगला होता. पुढें किसान चळवळीचेंही नेतृत्व करीत असताना ते कम्युनिस्ट पक्षांत सामील झाले. पण तात्विक मतभेदामुळें व संस्कृत हिंदीनिष्ठेमुळें ते दुसऱ्या महायुद्धापूर्वी पक्षांतून बाहेर पडले व तद-नंतर आपलें जीवन लेखन व संशोधन ह्या त्यांच्या आवडत्या कार्यांत व्यतीत केलें. त्यांच्या राष्ट्रसेवेबद्दल भारत सरकारनें त्यांना पद्मभूषण हा किताब देऊन त्याचा गौरव केला होता. गेल्या महिन्यांत बेशुद्धावस्थेंत रुग्णालयात ते असतांना त्यांचे अचानक निधन झालें भारताचा एक निष्ठावन्त; चतुरस्र साहित्यिक व प्रगाढ पंडित पंचतत्वांत विलीन झाला ह्याचें दुःख कुणालाही होईल.

—'सारस्वत'

अनुक्रमणिका

